







# जिल्हाधिकारी रायगड

अंक दुसरा
मे २०२२
(कालावधी - जानेवारी २०२२ ते एप्रिल २०२२)







प्रयत्न परिवर्तनाचे...
बुद्धिमत्तेच्या गरुडझेपेचे
कातकरी उत्थानाचे
वसुंधरेच्या संवर्धनाचे....





# मनोगत



प्रशासन म्हणून जनतेच्या जीवनात खरा बदल घडवून आणण्यासाठी, अगदी शेवटच्या व्यक्तीच्या चेहऱ्यावर समाधानाचं हास्य फुलवण्यासाठी रायगड जिल्हा प्रशासनातील सर्वांनी ऑगस्ट-सप्टेंबर महिन्यात ''परिवर्तन'' घडवून आणण्याची मनाशी खूणगाठ बांधली होती. त्यानुसार जिल्हा प्रशासनाने कामकाजास उत्साहाने सुरुवात केली. शेतकरी, कातकरी आदिवासी बांधवांना मुख्य प्रवाहात आणण्यासाठी कातकरी उत्थान अभियानांतर्गत ''सप्तसूत्री'' च्या माध्यमातून कातकरी बांधवांसाठी विविध उपक्रम राबविण्यास सुरुवात केली. यात विविध प्रकारचे शासकीय दाखले वाटप, आरोग्य शिबिर वैद्यकीय उपचार, शासकीय स्वयंरोजगार निर्मिती आदी उपक्रमांचा समावेश आहे.

जिल्ह्यातील युवक-युवतींमध्ये स्पर्धा परीक्षे विषयी जागरूकता बऱ्याच प्रमाणात कमी असल्याचे जाणवले. त्यांच्यातही जागरुकता वाढावी या दृष्टीने जिल्हा प्रशासनाने पुढाकार घेण्याचे निश्चित केले आणि ''गरुड झेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र'' ही संकल्पना अस्तित्वात आली. स्पर्धा परीक्षा केंद्राच्या जवळपास सात-आठ हजार विद्यार्थी रायगडमध्ये मुले-मुली प्रशासनात आपल्या माध्यमातून कामाचा ठसा उमटवतील, असा विश्वास वाटतो.

शासन निसर्गाशी असलेली कटिबद्धता निश्चित करण्यासाठी''माझी वसुंधरा'' हे अभियान राबवीत आहे. शासनाने सुचविलेल्या मार्गदर्शक तत्वांच्या आधारे रायगड जिल्हा प्रशासन कडून जिल्ह्यातील पर्यावरण संवर्धनासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले जात आहेत.

परिवर्तनाचा हा दुसरा अंक आपल्या हाती देताना मनस्वी समाधान मिळत आहे. आपल्या सर्वांच्या सहकार्याने जिल्ह्यात ''माझी वसुंधरा'', ''कातकरी उत्थान अभियान'' आणि ''गरुडझेप स्पर्धा परिक्षा केंद्राचे'' उपक्रम यशस्वीपणे राबविण्याचा जिल्हा प्रशासन प्रयत्न करीत आहे. जिल्ह्याच्या विकासाच्या दृष्टीने जिल्हा प्रशासन म्हणून करीत असलेल्या कामांना आपले असेच सहकार्य लाभो, अशी अपेक्षा...!

धन्यवाद!

**डॉ. महेंद्र कल्याणकर (भा.प्र.से.)**
जिल्हाधिकारी, रायगड

अंक दुसरा :
प्रकाशन - १ मे २०२२
(कालावधी - जानेवारी २०२२ ते एप्रिल २०२२)

संकल्पना व मार्गदर्शन
**डॉ. महेंद्र कल्याणकर** (भा.प्र.से.)
जिल्हाधिकारी, रायगड

विशेष सहकार्य
**श्री. अमोल यादव**
अपर जिल्हाधिकारी, रायगड

**डॉ. पद्मश्री बैनाडे**
निवासी उपजिल्हाधिकारी

**श्री. अमित सानप**
उपजिल्हाधिकारी (सा.प्र.)

**श्रीमती सुषमा सातपुते**
उपजिल्हाधिकारी (रोहयो)

**श्रीमती स्नेहा उबाळे**
उपजिल्हाधिकारी (निवडणूक)

**श्री. सर्जेराव मस्के-पाटील**
उपजिल्हाधिकारी (भूसंपादन)

**श्री. मधुकर बोडके**
जिल्हा पुरवठा अधिकारी

**श्री. शाम पोशट्टी**
जिल्हा प्रशासन अधिकारी

**श्री. विशाल दौंडकर**
तहसिलदार (सर्वसाधारण)

**श्री. सचिन शेजाळ**
तहसिलदार (महसूल)

**श्री. सतिष कदम**
तहसिलदार (पुनर्वसन)

**श्री. गोविंद वाकडे**
सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी

**श्रीमती शशिकला अहिरराव**
प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास प्रकल्प, पेण

संपादन
**श्री. मनोज शिवाजी सानप**
जिल्हा माहिती अधिकारी, रायगड

माहितीस्त्रोत
**सर्व उपविभागीय अधिकारी**
**सर्व तहसिलदार**
**सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत**
**कार्यालय प्रमुख**

माहिती संकलन व छायाचित्रे
**श्री. विठ्ठल बेंदुगडे**
**श्री. जयंत ठाकूर**
**श्री. प्रसाद ठाकूर**
**जिल्हा माहिती कार्यालय, रायगड-अलिबाग**

मांडणी मुद्रण
**आग्रावकर्स डिझाईन ग्राफीक्स, अलिबाग**
निर्मिती
**जिल्हाधिकारी कार्यालय, रायगड**

**केवळ अंतर्गत वितरणाकरिता...**

## वृक्ष लावा अंगणी पसरेल समृद्धी अवनी

वृक्ष वल्ली आम्हा सोयरी वनचरे।
पक्षी ही सुस्वरे आळविती ।।१।।
येणे सुखे रुचे एकांताचा वास
नाही गुण दोष अंगा येत ।।२।।
आकाश मंडप पृथ्वी आसन।
रमे तेथे मन क्रीडा करी ।।३।।
कथाकमंडलु देहउपचारा ।
जाणविती वारा अवसरु ।।४।।
हरिकथा भोजन परवडी विस्तार
करोनी प्रकार सेवू रुची।।५।।
तुका म्हणे होय मनासी संवाद
आपुलाची वाद आपणासी ।।६।।

-संत तुकाराम महाराज

## माझी वसुंधरा प्रतिज्ञा

मी भारताचा स्वच्छताप्रेमी नागरिक अशी प्रतिज्ञा करतो की,
मी - श्रमदानातून वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन करीन
मी - उर्जा बचतीसाठी सौरउर्जेचा व बायोगॅसचा वापर करीन
मी - नदी, तलाव स्वच्छतेस महत्व देऊन पाऊस पाणी संकलन करुन पाणी बचत करीन
मी - कचऱ्याचे ओला कचरा, सुका कचरा असे घरच्या घरी वर्गीकरण करीन
मी- प्लास्टिक पिशवी ऐवजी कापडी पिशवी वापरीन
मी- शोषखड्डयात सांडपाण्याचे व्यवस्थापन करीन व घनकचऱ्यापासुन सेंद्रीय खताची निर्मिती करीन
मी- इंधनाची बचत करुन वायु प्रदुषण कमी करेन
मी- पृथ्वी, वायु, आकाश, जल व अग्नी या पंचतत्वांच्या रक्षणासाठी सदैव कटीबद्ध राहून वसुंधरेचा सन्मान वाढवेन

"जय वसुंधरा"

# माझी वसुंधरा




मानव निर्मित प्रदूषणामुळे व जल, वायू परिवर्तनामुळे जैवविविधतेवर, पर्यावरणावर तसेच मानवी आरोग्यावर विपरित परिणाम होताना दिसून येत आहे. निसर्गाच्या असमतोलामुळे अनेक नैसर्गिक आपत्ती व विविध नवीन आजाराच्या साथी यांचा वाढता प्रादूर्भाव दिसून येत आहे. यासंदर्भात निसर्गाशी असणारे मानवाचे नाते पुन्हा एकदा वेगळ्याने परिभाषित करण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे. या बाबींची दखल घेऊनमहाराष्ट्र शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने दिनांक १४ ऑक्टोबर २०२० च्या शासन निर्णयामध्ये निसर्गाशी असलेली कटिबद्धता निश्चित करण्यासाठी **''माझी वसुंधरा''** अभियान राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

त्यानुषंगाने महाराष्ट्र शासन पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्याकडील शासन निर्णयान्वये **''माझी वसुंधरा'' अभियान हे रायगड जिल्ह्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये राबविण्याबाबत मान्यता देण्यात आली आहे.**

रायगड जिल्ह्यातील सर्व उपविभागीय अधिकारी, सर्व तहसिलदार, सर्व मुख्याधिकारी नगरपरिषद /नगरपंचायत, सर्व गटविकास अधिकारी व सर्व ग्रामपंचायतींना कळविण्यात आले आहे.

निसर्गाचा समतोल साधण्यासाठी, पर्यावरणाची हानी कमी करण्यासाठी आणि वातावरणातील प्रतिकूल बदलांना प्रतिबंधित करण्यासाठी **''माझी वसुंधरा''** अभियान हे शासकीय कार्यालयापुरते मर्यादित न राहता लोकचळवळ होणे आवश्यक आहे. यासाठी जिल्हा प्रशासन, सर्व स्थानिक स्वराज्य संस्था जिल्ह्यातील नागरी आणि ग्रामीण भागात विविध अभिनव उपक्रम राबवित आहेत.

या उपक्रमांमध्ये जिल्ह्यातील सर्व घटकांनी, नागरिकांनी आपापल्या परीने सक्रीय सहभागी होऊन हे अभियान यशस्वी करुया.



# माझी वसुंधरा




## या अभियानांतर्गत राबविण्यात येणारे उपक्रम :

- दोन्ही बाजूने मुद्रित होणाऱ्या प्रिंटरचा वापर करुन कागदांचा अपव्यय टाळावा.
- आठवड्यातून एकदा कार पूलिंग वापरावे.
- कार्यालयात येताना किमान एक दिवस सायकलचा वापर करावा.
- पिण्याच्या पाण्याचा अपव्यय टाळा.
- आवश्यकता असल्यासच वीज उपकरणे चालू ठेवावीत.
- वीजेची शक्य तेवढी बचत करावी.
- कार्यालयात एकलवार प्लॅस्टिकचा वापर करु नये.
- कार्यालयामध्ये स्वच्छता ठेवावी.
- कार्यालयाच्या आवारात शक्य असल्यास वृक्षारोपण करावे.
- बायोगॅस व खत व्यवस्थापनाची निर्मिती करणे.
- घनकचरा व्यवस्थापन करणे.
- घनकचऱ्याची विल्हेवाट लावण्यासाठी कॉम्पॅक्टर कॅप्सूल तंत्रज्ञानाचा वापर करणे.
- वृक्ष लागवड व वन संवर्धन करावे.
- अपारंपारिक उर्जा स्त्रोतांचा प्रचार-प्रसार व वापर करणे.
- प्लास्टिक बंदी करणे.
- जल स्त्रोतांचे शुद्धीकरण व सुशोभिकरण करणे.
- पावसाच्या पाण्याची साठवणूक करणे.
- मृद व जलसंधारणाची कामे करणे.
- हवेची गुणवत्ता सुधारण्यासाठी कार्यक्रम घेणे व शहराच्या
- मध्यभागी प्रदूषण मापक यंत्र बसविणे.
- जैवविविधतेचे संगोपन व संवर्धन करणे.
- नदी, तळे, नाले, गटारे यांची स्वच्छता करणे.
- हरित आच्छादने आणि जैवविविधता समृद्ध करणे.
- अपारंपारिक एलईडी दिव्यांचा वापर करणे.
- अविघटनशील कचऱ्यामुळे होणारे पर्यावरणातील दुष्परिणाम याची जनजागृती करणे व त्यावरील उपाययोजनांची प्रभावी अंमलबजावणी करणे.
- शासकीय कार्यालयाच्या छतावर सौर पॅनेल बसविणे.
- जनजागृतीपर सायकल रॅली, प्रभात फेरी यासारखे उपक्रम आयोजित करणे.
- वसुंधरेप्रति आपली जबाबदारी म्हणून जिल्ह्यातील प्रत्येक नागरिकाने **"माझी वसुंधरा"** अभियानांतर्गत पर्यावरण रक्षणाच्या अनुषंगाने **"हरित शपथ"**(Earth Pledge म्हणजेच #Epledge) घेवून त्याची अंमलबजावणी करण्याचा संकल्प करणे आवश्यक आहे.
- ही हरित शपथ http://majhivasundhara.in या वेब पोर्टलवर Take your Epledge now येथे अथवा #Epledge येथे क्लिक करुन ग्रुपने अथवा वैयक्तिकरित्या घेता येईल.
- राज्यातील जास्तीत जास्त नागरिकांना अशी हरित शपथ घेण्यास प्रोत्साहन मिळावे, म्हणून शहर /ग्राम स्तरावर नवीन वर्षाच्या पहिल्या दिवशी म्हणजे दिनांक ०१ जानेवारी२०२१ रोजी करोना संबंधातील सर्व नियमांचे पालन करुन आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमातून उपस्थित कर्मचारी व नागरिकांनी "हरित शपथ (Earth Pledge म्हणजेच #Epledge) घेतली.
- या हरित शपथेची नोंद http://majhivasundhara.in या वेब पोर्टलवर #Epledge येथे ग्रुप शपथ म्हणून करण्याची सुविधा उपलब्ध आहे.
- आपल्या जिल्ह्यातील सर्व शासकीय-निमशासकीय संस्था, स्वयंसेवी संस्था, शाळा, महाविद्यालये व नागरिक यांना करोना संबंधातील सर्व नियम विचारात घेवून ग्रुपने अथवा वैयक्तिकरित्या ऑनलाईन हरित शपथ घेवून त्याची नोंद http://majhivasundhara.in या वेब पोर्टलवर करण्याबाबत सूचित करण्यात आले.

अशा प्रकारे जिल्ह्यातील सर्व स्तरातील जास्तीत जास्त नागरिकांकडून हरित शपथ घेतली जाईल आणि " माझी वसुंधरा" उपक्रमात सक्रिय सहभागी होतील, यासाठी जिल्हा प्रशासन प्रयत्नशील आहे.








## जल



### जलसंवर्धनाचे विविध उपक्रम

- पाऊस पाणी संकलन
- नदी, तळे, नाली यांची स्वच्छता व पुनर्जीवन व नदी सौंदर्यीकरण
- सांडपाणी, मैला व्यवस्थापन व प्रक्रिया



## अग्नी



### नूतनीकरणायोग्य उर्जा स्त्रोतांच्या वापरास प्रोत्साहन

- सौर उर्जेवर चालणारे एलईडी दिवे लावणे.
- बायोगॅस प्रकल्पांची उभारणी.
- सौर पंपाचा जास्तीत जास्त वापर.
- हरित इमारतींची संख्या वाढविणे.



## वायू




### वायू गुणवत्ता राखणे

- धूळ कमी करण्यासाठी रस्त्याच्या बाजूच्या जागेत हरितीकरण. (खुरट्या उंचीची झाडे)
- उज्ज्वला योजनेची व्यापकता वाढविणे
- सायकल अथवा सौरउर्जेवर चालणारी वाहने वापरणे







# पृथ्वी



## हरित आच्छादन व जैवविविधता

- भारतीय प्रजातीच्या झाडांची लागवड करणे.
- उदा. वड, आंबा, काजू, चिंच, शेवगा, तुळस, जास्त पानांच्या झाडांची लागवड
- जुन्या व नव्याने निर्मित हरित क्षेत्रांचा विकास (जैवविविधता संवर्धन)

## घनकचरा व्यवस्थापन




- कचऱ्याचे संकलन, विलगीकरण व शास्त्रोक्त व्यवस्थापन
- जुन्या साठलेल्या कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रिया करणे
- प्लास्टिक कचरा व्यवस्थापन
- स्वयंपाकघरातील ओल्या कचऱ्यापासून कंपोस्टिंग करणे





# आकाश

## पर्यावरण सुधारणा व संरक्षणासाठी जनजागृती

- निसर्ग संवर्धनासाठी शपथ.
- हरित कायदा शपथेतून जनजागृती.
- व्यक्ती, संस्था, संघटना यांच्या सहभागातून पर्यावरण रक्षण.

# माझी वसुंधरा अभियान-अलिबाग




जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या हस्ते नगरपालिका शाळांना वॉटर प्युरिफायर व प्रथमोपचार पेटीचे वाटप करण्यात आले.

अलिबाग नगरपरिषदेमार्फत राबविण्यात येणाऱ्या माझी वसुंधरा अभियान, स्वच्छ भारत अभियान यांची जनजागृती करण्याकरिता अलिबागच्या समुद्रकिनाऱ्यावर माझी वसुंधरा अभियानांतर्गत ''आकाश व भूमी'' या तत्वाच्या प्रोत्साहनपर माझी वसुंधरा तत्वे दर्शविणाऱ्या जागांच्या अनुषंगाने वाळू शिल्प तयार करण्यात आले व वसुंधरेचे संवर्धन करण्याकरिता हरित शपथ घेण्यात आली.

दि.०८ मार्च २०२२ रोजी जागतिक महिला दिनाचे औचित्य साधून अलिबाग नगरपरिषदेच्या महिला व बालकल्याण विभागामार्फत अलिबाग नगरपरिषदेने स्थापन केलेल्या बचतगटातील महिलांकरीता स्वच्छ सर्वेक्षण अभियान व माझी वसुंधरा अभियान अंतर्गत टाकावू पासून टिकावू वस्तू तयार करण्याची स्पर्धा आयोजित केली होती.

या स्पर्धेमध्ये १५ बचतगटांनी टाकावू पासून टिकावू वस्तू तयार करुन आणल्या होत्या. त्यापैकी अदिशक्ती महिला बचतगट, रामनाथ अलिबाग यांना प्रथम क्रमांक, समता महिला बचतगट, सिध्दार्थ नगर अलिबाग, व्दितीय क्रमांक, सारस्वत महिला बचतगट, ब्राम्हणआळी अलिबाग तृतीय क्रमांक, स्व.ॲड.नमिता नाईक महिला बचतगट, कोळीवाडा अलिबाग व समृध्दी महिला बचतगट, रामनाथ अलिबाग यांना उत्तेजनार्थ बक्षिस देण्यात आले.



अलिबाग नगरपरिषद व लायन्स क्लब अलिबाग यांच्या संयुक्त विद्यमाने माझी वसुंधरा अभियान अंतर्गत अलिबाग समुद्र किनारा येथून सायक्लोथॉन २०२२ असे सायकल रॅलीचे आयोजन

## माझी वसुंधरा अभियानांतर्गत किहीम समुद्र किनाऱ्यावर स्वच्छता मोहीम संपन्न





# माझी वसुंधरा अभियान-पेण

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

**पेण नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात–**

* पेण नगरपरिषद हद्दीत एकूण ३ हजार ३०० पेक्षा जास्त वृक्षलागवड करण्यात आली. त्यामध्ये ५८ स्वदेशी झाडांची लागवड करण्यात आली.
* पेण नगरपरिषद प्रशासकीय इमारतीवर गार्डन तयार करण्यात आले आहे.
* पेण नगरपरिषद शाळेच्या विद्यार्थ्यांनी टाकावू पासून टिकावू वस्तू तयार करून त्याचे प्रदर्शन भरविण्यात आले.
* पेण नगरपरिषद हद्दीत १५ मेट्रीक टन कचरा निर्माण होतो त्यापैकी ९ मेट्रीक टन ओला कचरा व ६ मेट्रीक टन सुका कचरा आहे. ओल्या कचऱ्यावर विंड्रो कंपोस्टिंगद्वारे खत निर्मिती केली जाते व सुका कचरा साठविण्यासाठी एमआरएफ सेंटर तयार करण्यात आले आहे.
* सेप्टिक टँक मध्ये निर्माण होणाऱ्या मैल्यावर प्रक्रिया करण्यासाठी १० केएलडी क्षमतेचा FSTP प्रकल्प आहे.



शहरात दर महिन्यात वातावरणातील हवेची गुणवत्ता तपासणी केली जाते.

* पेण शहरात हवेचे प्रदूषण कमी करण्यासाठी आठवड्यातून किमान एकदा सायकलचा वापर करावा असे आवाहन करण्यात आले आहे, त्याकरिता सायकल रॅलीचे आयोजन करण्यात आले होते.
* पावसाचे पाणी साठवणूक करून पुन:र्वापर करण्याकरिता नविन इमारतींना रेन वॉटर हार्वेस्टिंग बंधनकारक करण्यात आले आहे.
* पेण शहरातील कासार तलाव, कवंडाल तलाव यांचा गाळ काढून पुनरुज्जीवित करण्याचे काम प्रस्तावित आहे.
* गणेश विसर्जन तसेच दुर्गा विसर्जन च्या वेळी जलप्रदूषण टाळण्याकरिता कृत्रिम तलाव तयार करण्यात आले. शाडूच्या मातीच्या मूर्ती खरेदीबाबत नागरिकांना आवाहन करण्यात आले.
* नागरिकांमध्ये जनजागृती करण्याकरिता बॅनर, पोस्टर, पेंटिंग्स, पथनाट्य इ. उपक्रम राबविण्यात आले.
* शहरामध्ये ऊर्जा संवर्धन करण्याकिता ५ सोलार हायमास्ट व एकूण ५१ सोलार दिवे बसविण्यात आले आहेत.
* ऊर्जा बचत करण्यासाठी पारंपारिक पध्दतीने पथदिवे काढून एकूण २ हजार ४७३ LED पथदिवे बसविण्यात आले.

* जलसंवर्धन करण्याकरिता पेण नगरपरिषद हद्दीतील विश्वेश्वर स्मशानभूमी येथील भोगावती नदी मधील जलपर्णी काढण्याकरिता स्वच्छता अभियान राबविण्यात आले.







**भोगावती नदी मधील जलपर्णी काढण्याकरिता स्वच्छता अभियान राबविण्यात आले.**



* पेण नगरपरिषद प्रशासकीय इमारतीच्या छतावर २० KW चे काम MEDA अंतर्गत सोलर रुफटॉप सिस्टीमचे काम प्रगतीपथावर आहे.




* इलेक्ट्रिक वाहनांना प्रोत्साहन देण्याकरिता पेण नगरपरिषदेमार्फत फ्री-चार्जिंग स्टेशन तयार करण्यात आले आहे.

# माझी वसुंधरा अभियान-कर्जत

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

**कर्जत नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात**

- शहरात वृक्षांची संपत्ती वाढवण्यासाठी २ हजार स्थानिक प्रजातींची लागवड करण्यात आली आहे.
- घंटागाडीवरून संपूर्ण कर्जत शहरात जनजागृती करण्यात येत आहे. सुका, ओला व घरगुती घातक कचरा प्लास्टिक १००% वर्गीकृत करून १००% कचऱ्यावर प्रक्रिया करण्यात येते.
- शहरामध्ये दैनंदिन निर्माण होणाऱ्या कचऱ्याचे प्रमाण कमी करण्यासाठी नगरपरिषदेमार्फत वैयक्तिक खत प्रकल्प म्हणजेच Home Composting ला चालना दिली जात आहे.
- माझी वसुंधरा अभियान अंतर्गत कर्जत शहरामध्ये १००% प्लास्टिक बंदीची कार्यवाही सुरु आहे.
- संपूर्ण शहरात सायकल रॅलीचे आयोजन करण्यात आले होते.
- जैवविविधता अहवाल तयार करण्यात आला (heritage trees) असून त्याची location mapping झालेली आहे.
- शहरामध्ये वायू प्रदूषण कमी करण्यासाठी तसेच शहराचे




हरित आच्छादान वाढविण्याच्या दृष्टीने माझी वसुंधरा अभियान काळात वृक्ष लागवड करण्यात आली.

- शहराचे हरित आच्छादन वाढविण्याच्या दृष्टीने रस्त्याच्या कडेला पूरक उंचीची झाडे तसेच रस्ते दुभाजकांमध्ये फुलझाडे लावण्यात आली आहेत.
- नॉन मोटराईज्ड वाहनांना तसेच नो Vehicle Day" ला प्रोत्साहन देण्यासाठी शहरात सायकल रॅली आयोजित करण्यात होती.
- इलेक्ट्रिक वाहनांना प्रोत्साहन देण्यासाठी शहरामध्ये ३ सुसज्ज असे चार्जिंग पॉईंट सुरू केले आहेत.
- इलेक्ट्रिक वाहन वापरण्यास प्रोत्साहन देण्यासाठी कर्जत नगरपरिषदेने जनजागृती कार्यक्रम आयोजित केले होते.
- शहरातील सर्व वॉर्ड मधील विविध भागामध्ये वायू/ हवेची गुणवत्ता तपासणी करण्यात आली.
- शहरात सायकल ट्रॅकचे काम प्रगतीपथावर आहे.
- पर्यावरणपूरक गणेशोत्सव साजरा करण्याच्या दृष्टीने शाडू



**शहरामधील वायू प्रदूषण कमी करुन हरित आच्छादान वाढविण्याच्या दृष्टीने शहरात वृक्ष लागवड करण्यात आली.**

मातीपासून गणेश मूर्ती बनविण्याचा उपक्रम राबविण्यात आला. तसेच श्री गणेश विसर्जन घाटावर कृत्रिम तलाव निर्माण करून तेथे श्री गणेश मूर्तीचे विसर्जन करण्यात आले होते. त्यामुळे जल प्रदूषण कमी होण्यास मदत झाली.

- जलसंवर्धनाकरिता नदी- नाल्याची स्वच्छता, रेन वॉटर हार्वेस्टिंग बंधनकारक करणे यासारखे उपक्रम राबविले जात आहेत.
- नगरपरिषद इमारतीला रेन वॉटर हार्वेस्टिंग सिस्टिम बसविण्यात आली आहे.
- अपारंपरिक ऊर्जेच्या वापरास चालना मिळावी म्हणून नगरपरिषद इमारतीला सौरपत्रे लावण्यात आले आहेत.
- शहरामधील जलस्त्रोतांचे नूतनीकरण व सुशोभिकरण करण्यात आले आहे.
- अपारंपरिक ऊर्जेच्या वापरास चालना मिळावी म्हणून शहरात एकूण ५ हजार LED व ५० सोलार लाईट बसविले आहेत.
- कर्जत शहरात नवीन ग्रीन बिल्डींग तयार करण्यात यावी, यासाठी प्रस्ताव बनविण्यात आला आहे.



# माझी वसुंधरा अभियान-माथेरान

"स्वच्छ माथेरान.. हरित माथेरान.. सुंदर माथेरान"

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

**माथेरान गिरीस्थान नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात**

- होळी या सणाच्या पूर्वसंध्येला वृक्ष तोड करून होळी सण साजरा करण्याऐवजी वृक्षलागवड करून हा सण साजरा करण्याचे आवाहन पालिका प्रशासनाकडून केले गेले.
- त्यासाठी कार्यालयीन वन ही संकल्पना आणि याची मोहीम माथेरान नगरपरिषदेच्या प्रशासक तथा मुख्याधिकारी श्रीमती सुरेखा भणगे यांनी सुरु केली.
- यात कार्यालयातील सर्व अधिकारी - कर्मचाऱ्यांच्या हस्ते कार्यालयाच्या मोकळ्या जागी पर्यावरण, माथेरानमधील जैवसृष्टी व येथील पशू-पक्ष्यांना पूरक अशा ४० झाडांचे वृक्षारोपण करण्यात आले.




- ही झाडे जगविण्याची जबाबदारी संबंधित अधिकारी-कर्मचाऱ्यांना सोपविली असून त्यांनी ही झाडे जगविण्यासाठी स्वत:ला वचनबद्ध केले आहे.
- माथेरानमधील वृक्षसंपदा इतर शहरांच्या मानाने भरपूर आहे. परंतु, नैसर्गिक वादळे, अतिवृष्टी, मातीची धूप, वणवे लागण्याच्या घटना यामुळे येथील वृक्ष संख्या घटत आहे. त्यामुळे सर्वांनी किमान एक तरी नवीन वृक्ष लावून जतन करायला हवे. त्यासाठी नगरपरिषद हद्दीतील सर्व नागरिकांना वृक्ष खरेदी, लागवड व संगोपनासाठी मदत करण्याबाबत आवाहन करण्यात आले आहे.
- जागतिक महिला दिनाचे औचित्य साधून माथेरान शहरातील सर्व महिलांना माझी वसुंधरा हरित शपथ देण्यात आली.
- २५ जानेवारी राष्ट्रीय पर्यटन दिवस आणि राष्ट्रीय मतदार दिवसाचे औचित्य साधून माथेरान नगरपरिषदेने माथेरान मध्ये येणाऱ्या सर्व पर्यटकांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत केले.
- सर्व पर्यटकांसाठी आणि नागरिकांसाठी मॅरेथॉन स्पर्धा, अश्व स्पर्धा घेण्यात आल्या. या कार्यक्रमास देशी विदेशी पर्यटकांनी आणि नागरिकांनी मोठ्या प्रमाणात प्रतिसाद दिला.
- नेरळ-माथेरान घाट रस्ता साफसफाई करणे, शाळेतील मुलांची चित्रकला स्पर्धा, हरित शपथ, पर्यावरण संरक्षण आणि वृक्ष लागवड जनजागृती कार्यक्रम, भित्तीचित्रे असे जनजागृतीपर विविध उपक्रम राबविण्यात आले.
- माथेरान गिरीस्थान नगरपरिषद हद्दीत निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यावर पूर्णतः प्रक्रिया करून शून्य कचरा (Zero Dumping Ground) ही संकल्पना कार्यान्वित करण्यात आली आहे.




**अधिकारी-कर्मचाऱ्यांच्या हस्ते पर्यावरण, माथेरानमधील जैवसृष्टीला पूरक अशा ४० झाडांचे वृक्षारोपण करण्यात आले.**



- माझी वसुंधरा अभियानांतर्गत जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या नियोजनानुसार रायगड जिल्ह्यातील सर्व नगरपालिका क्षेत्रांमध्ये पर्यावरण जनजागृतीनिमित्त सायकल रॅलीचे आयोजन करण्यात आले होते.
- या सायकल रॅलीची सुरुवात माथेरान गिरीस्थान नगरपरिषदेपासून पर्यावरण आणि पर्यटनमंत्री ना. श्री. आदित्य ठाकरे आणि पालकमंत्री ना. कु. आदिती तटकरे यांच्या हस्ते हिरवा झेंडा दाखवून करण्यात आली.
- माझी वसुंधरा अभियानांतर्गत घडीपत्रिका, स्टिकर्स, बॅचेस, बोधचिन्हांचे प्रकाशन आणि अनावरण सोहळा माथेरान येथे संपन्न झाला.

### खोपोली नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात

- शहराचे हरित आच्छादन वाढविण्याच्या दृष्टीने रस्त्यांलगत तसेच घनकचरा व्यवस्थापन केंद्रात १ हजार ५०० देशी




प्रजातींच्या वृक्षांची लागवड करण्यात आली.

- शून्य घनकचरा संकल्पनेबाबत जनजागृती करून ओल्या कचऱ्यापासून Home Composting वर भर देण्यात आला आहे.
- शहरातील मलनि:स्सारण प्रकल्प केंद्रामधील प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुन:र्वापर महावीर उद्यानामधील कारंज्यात केले जाते.
- पर्यावरणपूरक गणेश मूर्ती व सजावट करावी याबाबत जनजागृती करण्यात आली. गणेश विसर्जनासाठी २ कृत्रिम तलाव तयार करण्यात आले होते. तसेच निर्माल्यासाठी निर्माल्य कलश ठेवण्यात आले होते.
- फटाक्यांवर बंदी घालण्यासाठी दिवाळीपूर्व जनजागृती करण्यात आली.
- शहरातील राष्ट्रीय महामार्ग-४ च्या रस्त्याच्या लांबी वर सर्व पथदिवे LED लावण्यात आले आहेत. त्याद्वारे विजेची बचत होत आहे.
- इलेक्ट्रिक वाहनांना प्रोत्साहन देण्यासाठी शहरात २ ठिकाणी मोफत चार्जिंग पॉइन्टची सुविधा उपलब्ध करून देण्यात आली आहे.
- नगरपरिषदेच्या सर्व अधिकारी व कर्मचाऱ्यांसाठी "Wednesday Cycle Day" घोषित करण्यात आले आहे.
- अग्निशमन स्टाफ क्वार्टर, खोपोली येथे रेन वॉटर हार्वेस्टिंग करण्याबाबत कार्यवाही सुरू आहे.
- शहरात आयोजित करण्यात आलेल्या सायकल रॅलीत शहरातील ५०० नागरिकांनी सहभाग घेतला होता.
- शहरात AIR QUALITY MONITORING हे एकूण ३ ठिकाणी ३ महिने करण्यात आले आहे.
- पर्यावरणास हानिकारक प्लास्टिक, त्याचा वापर कमीत-कमी करण्यासाठी शाळेतील विद्यार्थ्यांमध्ये जनजागृती करण्याच्या दृष्टीने चित्रकला, निबंध, कलाकृती (waste to best), पथनाट्य अशा स्पर्धा घेण्यात आल्या.
- खोपोली नगरपालिकेतर्फे स्त्रियांसाठी शून्य कचरा कार्यक्रम अंतर्गत आयोजित करण्यात आलेल्या हळदी-कुंकू कार्यक्रमात कापडी पिशव्यांचे वाटप करण्यात आले.



शहरातील राष्ट्रीय महामार्ग-४ च्या रस्त्याच्या लांबी वर सर्व पथदिवे LED लावण्यात आले आहेत







# माझी वसुंधरा अभियान-रोहा




माझी वसुंधरा अभियानांतर्गत पथनाट्यद्वारे जनजागृती




इलेक्ट्रिक वाहनांसाठी फ्री-चार्जिंग स्टेशन






माझी वसुंधरा बाबत सायकल रॅलीद्वारे जनजागृती मोहीम






माझी वसुंधरा अभियानांतर्गत चित्रकला, निबंध व वक्तृत्व स्पर्धाद्वार जनजागृती मोहीम



# माझी वसुंधरा अभियान-महाड








माझी वसुंधरा अभियानांतर्गत सायकल रॅलीद्वारे जनजागृती






माझी वसुंधरा शपथ




माझी वसुंधरा अभियानांतर्गत हाफ मॅरेथॉन




ई- वाहनांकरीता चार्जिंग पॉईंट



### म्हसळा नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात

* म्हसळा नगरपंचायतीतर्फे एकूण २०० देशी जातीच्या वृक्षाची लागवड करण्यात आली आहे. म्हसळा नगरपंचायतीमार्फत म्हसळा कन्या शाळा आवारात नवीन हरित जागा तयार करण्यात आली आहे.
* म्हसळा नगरपंचायतीमार्फत तयार केलेल्या नवीन हरित जागा म्हसळा कन्या शाळा आवार) व हरित जागा (म्हसळा दुर्गाबाडी क्षेपणभूमी) या जागांचे नगरपंचायतीमार्फत संगोपन व संवर्धन करण्यात येते.
* म्हसळा नगरपंचायतहद्दीमधील जागेमध्ये अंदाजे ३३० पेक्षा जास्त वृक्ष उपलब्ध आहेत.



* म्हसळा नगरपंचायतीमध्ये १०० ओला, सुका, घातक व सॅनिटरी कचरा गोळा केला जातो व त्यावर प्रक्रिया करून ओल्या कचऱ्यापासून सेंद्रिय खत तयार केले जाते व सुक्या कचऱ्यावर प्रक्रिया केली जाते.
* शून्य घनकचरा संकल्पनेच्या अनुषंगाने प्रचार प्रसिद्धी जनजागृती करून ओल्या कचऱ्यापासून Home Composting वर भर देण्यात आला आहे.
* म्हसळा नगरपंचायतीमार्फत प्लास्टिक बंदीसाठी जनजागृती करण्यात आली असून शहरातील सर्व फळविक्रेते व दुकानदार यांना प्लास्टिक बंदीबाबत सूचना देण्यात आली आहे. घंटागाडीवर बॅनर आणि ऑडिओ क्लिप लावून प्लास्टिक बंदी बाबत जनजागृती / दंडात्मक कार्यवाही सुरु आहे.
* नागरिकांमध्ये जनजागृती होण्यासाठी शाळांमध्ये विविध स्पर्धा घेण्यात आल्या व शहरातील विविध चौकांचे सुशोभिकरण करून त्यावर प्लास्टिक बंदीबाबत संदेश देण्यात आले आहेत.
* म्हसळा शहरामध्ये BIO Medical कचऱ्याचे व्यवस्थापन वैयक्तिक हॉस्पिटलमार्फत करण्यात येते.
* म्हसळा नगरपंचायतीमध्ये Scientific treatment of legacy waste Bio mining सादरीकरण टप्प्यात आहे.
* म्हसळा नगरपंचायती सध्या ODF+ नामांकन प्राप्त असून




* यावर्षी ODF++ साठी नोंदणी करण्यात आली आहे.
* FSTP प्रकल्प कार्यान्वित झालेला आहे.
* म्हसळा नगरपंचायतीमार्फत बांधकाम कचरा गोळा करून त्यावर प्रक्रिया करुन प्राप्त झालेला बांधकाम कचरा नगरपंचायत हद्दीमध्ये सुरु असलेल्या कामांसाठी कच्चा माल म्हणून वापरला जातो.
* म्हसळा नगरपरिषदेमार्फत इलेक्ट्रिक वाहनांबाबत जनजागृती करण्यात आली असून शहरात एकूण ७ नागरिकांनी इलेक्ट्रिक दुचाकी वाहने खरेदी केली आहेत. या वाहनांसाठी म्हसळा नगरपंचायतजवळ विद्युत चार्जिंग स्टेशन उभारण्याचे प्रस्तावित आहे.
* म्हसळा शहरामध्ये उपलब्ध असलेल्या हिंगोलडोह यांचे संगोपन व संवर्धन नगरपंचायतीमार्फत करण्यात येते. तसेच शहरातील Storm water drains व नाल्यांची साफसफाई करून पाण्याचे संवर्धन केले जाते.
* म्हसळा नगरपंचायत इमारतीचे Rain water harvesting करण्याचे काम सुरु आहे.
* म्हसळा शहरातील एकूण १५ नागरिकांनी त्यांच्या घरांवर Rain water harvesting percolation pit तयार केलेले आहेत.
* Promotion of eco friendly idol अंतर्गत गणपती उत्सवाच्या काळात म्हसळा नगरपंचायतीने केलेल्या पर्यावरण पूरक गणेशोत्सव साजरा करण्याच्या आवाहनाला नागरिकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.
* सौर उर्जेबाबत विविध कार्यक्रमांच्या माध्यमातून म्हसळा नगरपंचायतीमार्फत जनजागृती करण्यात आली.
* शहरातील खाजगी मालमत्ताधारकांकडून इमारतीवर सोलर पॅनेल तसेच सोलर हिटरचा वापर सुरु करण्यात आला आहे.
* म्हसळा शहरामध्ये सार्वजनिक ठिकाणी एकूण ५४० LED लाईट नगरपंचायतीमार्फत बसविण्यात आले आहेत.



## मुरुड नगरपरिषदेच्या कार्यक्षेत्रात

- मुरुड नगरपरिषदेतर्फे एकूण ५०० देशी जातीच्या वृक्षांची लागवड करण्यात आली आहे.
- हेरीटेज व सर्वसाधारण वृक्षांच्या गणनेचे काम पूर्ण करण्यात आले आहे.
- मुरुड नगरपरिषदेमार्फत जैवविविधता नोंदवही तयार करण्यात आली असून पुढील मान्यता मिळविण्यासाठी जैवविविधता मंडळ, पुणे येथे पाठविण्यात आली आहे.
- मुरुड नगरपरिषदेमार्फत तयार केलेल्या नवीन हरित जागा (बसस्थानक) व जुनी हरित जागा (मुरुड समुद्रकिनारा भाग) या जागाचे नगरपरिषदेमार्फत संगोपन व संवर्धन करण्यात येते.



- मुरुड नगरपरिषद हद्दीमधील जागेमध्ये अंदाजे ३३% पेक्षा जास्त वृक्षांची संख्या उपलब्ध आहे.
- मुरुड नगरपरिषद हद्दीमध्ये १००% ओला, सुका, घातक व सॅनिटरी कचरा गोळा केला जातो व त्यावर प्रक्रिया करून ओल्या कचऱ्यापासून सेंद्रिय खत तयार केले जाते व सुका कचरा हा MRF मध्ये वर्गीकरण केले जाते.
- मुरुड नगरपरिषदेमार्फत प्लास्टिक बंदीसाठी जनजागृती करुन शहरातील सर्व फळविक्रेते व दुकानदार यांना प्लास्टिक बंदीबाबत सूचना देण्यात आली आहे.
- नागरिकांमध्ये जनजागृतीसाठी शाळांमध्ये विविध स्पर्धा घेण्यात आल्या व शहरातील विविध चौकांचे सुशोभीकरण करून त्यावर प्लास्टिक बंदीबाबत संदेश देण्यात आले आहेत.







- मुरुड शहरामध्ये BIO Medical कचऱ्याचे व्यवस्थापन महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाने नेमून दिलेल्या MUMBAI WASTE MANAGEMENT या संस्थेद्वारे करण्यात येते.
- मुरुड नगरपरिषद हद्दीमध्ये जुन्या साठलेल्या कचऱ्यावर प्रक्रिया ही BIOMINING द्वारे करण्यात आलेली आहे.
- मुरुड नगरपरिषदेस सध्या ODF+ नामांकन प्राप्त असून यावर्षी ODF++ साठी नोंदणी करण्यात आली आहे.




- मुरुड शहरामध्ये हवेची गुणवत्ता (Air Quality Monitoring) तपासणी पूर्ण करण्यात आली आहे.
- मुरुड शहरामध्ये दिवाळीच्या काळात सोशल मीडिया तसेच सायकल रॅलीच्या माध्यमातून फटाके व प्लास्टिक बंदीबाबत जनजागृती करण्यात आली.
- मुरुड नगरपरिषदेमार्फत बांधकाम कचरा गोळा करून त्यावर प्रक्रिया करुन तो कचरा नगरपरिषद हद्दीमध्ये सुरु असलेल्या कामासाठी कच्चा माल म्हणून वापरला जातो.
- मुरुड नगरपरिषद हद्दीत उपलब्ध असलेल्या समुद्रकिनारी भागांमध्ये सायकल ट्रॅक तयार करण्याचे काम प्रगतीपथावर आहे.
- मुरुड नगरपरिषदेमार्फत इलेक्ट्रिक गाड्यांबाबत जनजागृती करण्यात आली असून शहरात एकूण १५ नागरिकांनी

इलेक्ट्रिक दुचाकी वाहने खरेदी केली आहेत.

* मुरुड शहरामध्ये उपलब्ध असलेल्या गारंबी व आंबोली धरणाचे संगोपन व संवर्धन नगरपरिषदेमार्फत करण्यात येते तसेच शहरातील Storm water drains व नाल्याची साफसफाई करून पाण्याचे संवर्धन केले जाते.
* मुरुड शहरातील एकूण १५ नागरिकांनी त्यांच्या घरावर Rain water harvesting व percolation pit तयार केलेले आहेत.
* Promotion of eco friendly idol अंतर्गत गणपती उत्सवाच्या काळात मुरुड नगरपंचायतीने केलेल्या पर्यावरण पूरक गणेशोत्सव साजरा करण्याच्या आवाहनाला नागरिकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.
* सौर उर्जेबाबत विविध कार्यक्रमांच्या माध्यमातून मुरुड नगरपरिषदेमार्फत जनजागृती करण्यात आली. त्यामुळे शहरातील ३ हॉटेल मालकांनी सोलर हिटरचा वापर सुरु केला आहे.
* दि.०१ एप्रिल २०२१ पासून मुरुड शहरामध्ये सार्वजनिक ठिकाणी एकूण ७०० नवीन LED लाईट नगरपरिषदेमार्फत बसविण्यात आल्या आहेत.
* मुरुड नगरपरिषदेमार्फत मुरुड शहरातील सर्व शासकीय कार्यालये व शाळांमध्ये एकूण १५ सामुदायिक E-pledge व ५०० वैयक्तिक E-pledge घेण्यात आल्या.
* मुरुड शहरातील सर्व शाळांमध्ये निबंध स्पर्धा, चित्रकला स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा व टाकावू पासून टिकावू वस्तू बनविणे इत्यादी स्पर्धांचे आयोजन करण्यात आले व प्रत्येक स्पर्धेतील विजेत्यांना प्रमाणपत्र देऊन गौरविण्यात आले.
* शहरातील विविध चौकांचे सुशोभिकरण व रंगरंगोटी करून त्याद्वारे माझी वसुंधरा अभियानाचा जनतेमध्ये जास्तीत जास्त प्रसार व प्रचार होण्यासाठी प्रयत्न सुरू आहेत.




## माझी वसुंधरा अभियान-श्रीवर्धन

**माझी वसुंधरा अभियान – लोकसहभागातून सार्वजनिक स्थळांची स्वच्छता मोहिमेंतर्गत जीवनेश्वर कुंड तलाव (श्रीवर्धन नगरपरिषद) येथे स्वच्छता मोहीम राबविण्यात आली.**















# "माझी वसुंधरा" अभियानास प्रसारमाध्यमांची उत्तम साथ...!



## अलिबागेत 'माझी वसुंधरा' अभियानांतर्गत
## लायन्स अलिबाग सायक्लोथॉनला प्रतिसाद

**चित्रलेखा पाटील यांच्यासह मान्यवरांची उपस्थिती**

।अलिबाग।विशेष प्रतिनिधी।

माझी वसुंधरा मोहिमेंतर्गत अलिबाग नगरपरिषद आणि लायन्स क्लब अलिबाग यांच्यावतीने अलिबाग शहरात सायक्लोथॉन चे आयोजन करण्यात आले होते.या स्पर्धेला उदंड प्रतिसाद लाभला.

या सायक्लोथॉनला अलिबाग नगरपरिषदेच्या नगरसेविका चित्रलेखा पाटील यांनी झेंडा दाखविला. यावेळी उपनगराध्यक्षा अॅड.मानसी म्हात्रे, गटनेते प्रदीप नाईक,मुख्याधिकारी अंगाई साळुंखे,लायन्स क्लब चे अध्यक्ष भगवान मालपाणी,प्रविण सरनाईक,महेंद्र पाटील आदी उपस्थित होते.स्पर्धेत सहभागी झालेल्यांना जिल्हाधिकारी महेंद्र कल्याणकर यांच्या हस्ते प्रमाणपत्रे देण्यात आली.




जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांचे प्रतिपादन; कचरा पुनर्व्यवस्थापनावर भर

## वसुंधरा हिरवीगार ठेवण्याकरिता काळजी घ्या

निखिल म्हात्रे
लोकमत न्यूज नेटवर्क

लोकमत वाचताना जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर.

**धनकचरा व्यवस्थापनावर भर**

लोकमत यंदा कर्तव्य आहे

**जनजागृतीसाठी निधीची तरतूद**

## मुरुडमध्ये सायकल रॅलीद्वारे जनजागृती



। मुरूड : जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली मुरुड नगरपरिषदेचे मुख्याधिकारी पंकज भुसे यांच्या पुढाकारातून स्वच्छता सर्वेक्षण अंतर्गत माझी वसुंधरा अभियान राबवत मुरूड शहरात सायकल रॅली व पथनाट्य काढून स्वच्छतेविषयी जनजागृती करण्यात आली. सायकल रॅलीचा शुभारंभ नगराध्यक्षा स्नेहा पाटील यांच्या हस्ते झेंडा दाखवून करण्यात आला.

यावेळी उपनगराध्यक्षा नौसिन दरोगे, परेश कुंभार, ... उपस्थित होते.

शहरातील विविध ठिकाणी अशोक केदार आर्ट्स यांच्या संकल्पनेतून जागर उत्सव पथनाट्य सादरीकरण करण्यात आले. या पथनाट्यात स्च्छ भारत अभियान, पाणी, जंगल, वृक्षारोपण, सौरऊर्जा, जैवविविधता, प्रदूषण टाळा, आपली वसुंधरा सुंदर व स्वच्छ ठेवा आदी विषय घेण्यात आले. त्याबरोबर ओला कचरा, सुका कचरा, परिसर स्वच्छता कसे ठेवावे याबाबत नागरिकांना मार्गदर्शन करण्यात आले. अशोक केदार, माधवी ...

## पर्यावरण रक्षणासाठी सायकल रॅली



। नेरळ । वार्ताहर ।

माझी वसुंधरा अभियानाच्या निमित्ताने कर्जत नगरपरिषदेच्या माध्यमातून पर्यावरण रॅली काढण्यात आली. शहरातील असंख्य सायकलपटूनी या रॅलीमध्ये सहभागी ... सर्वेक्षण अभियान २०२१ मध्ये देशात थ्री स्टार मानांकन मिळविले आहे. त्याचवेळी राज्य सरकारच्या माझी वसुंधरा अभियानमध्ये नगरपरिषदेच्या माध्यमातून पर्यावरण पूरक उपक्रम राबविले जात आहेत. त्यात शहरात ...

**सौंदर्यीकरण** कर्जत शहराच्या वैभवात पडणार भर

## कोपरा गार्डन नवी ओळख निर्माण करणा



कर्जत, (वा.) जिल्ह्यातील स्वच्छतेच्या बाबतीत आघाडीवर असलेले कर्जत शहर नव्याने उपक्रम राबवित असलेल्या कोपरा गार्डनमुळे कर्जतच्या वैभवात आणखी भर पडणार आहे. कर्जत नगरपरिषदेला स्वच्छ भारत मधून मिळालेल्या बक्षिसाच्या रकमेतून शहरात २५ ठिकाणी कोपरा गार्डन विकसित केले आहे. दरम्यान, कर्जत नगरपरिषदेच्या नगराध्यक्षा सुवर्णा जोशी आणि पालिका मुख्याधिकारी डॉ. पंकज पाटील यांच्या संकल्पनेतून कर्जत शहरात कोपरा गार्डन ही संकल्पना राबविली जात आहे.

### २५ ठिकाणी होणार गार्डन

- कर्जत शहरात विविध २५ ठिकाणी स्वच्छ भारत अभियान मधून कोपरा गार्डन विकसित केले जात आहेत. त्या कोपरा गार्डनची रचना जांभा दगड वापरून केली जात आहे.
- त्या बांधकामावर काही ठिकाणी म्युरल्स तर काही ठिकाणी स्टॅच्यु उभारले जाणार आहेत. त्यातील ८ कोपरा गार्डनचे लोकार्पण केले जात आहे. त्याचवेळी शहरात अन्य ठिकाणी कोपरा गार्डनची कामे अंतिम टप्प्यात आहेत.
- शहरात कोपरा गार्डन उभारण्यासाठी एक कोटी ... निधी खर्च केला जाणार आ...
- या कोपरा गार्डनच्या माध्यम... शहराचे रूप पालटणार आ... कोपरा गार्डनवर दोन ठिका... आय लव्ह कर्जत, तसेच का... ठिकाणी पंढरपूर वारी, छत्र... शिवाजी महाराज यांचा राज्याभिषेक, भगवान गौतम... आदी म्युरल्स आणि स्टॅच्यु ... जात आहेत.

### पुरस्कारांची रक्कम वापरून होते आहे सौंदर्यीकरण

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणातून या शहरातील रस्ते कॉंक्रीटचे झाले आणि त्यानंतर बैठ्या चाळीच्या आणि वाडे असलेल्या या शहराचे रूप पालटले आहे. नागरी स्वच्छता अभियान आणि त्यानंतर स्वच्छ सर्वेक्षण अभियानांतर्गत सातत्याने कर्जत नगरपरिषदेला पुरस्कार मिळत राहिले आणि त्या पुरस्कारांची रक्कम आता कर्जत शहराच्या वैभवात भर घालण्यासाठी कर्जत नगरपरिषद करीत आहेत. त्या माध्यमातून कर्जत शहरात २५ ठिकाणी कोपरा गार्डन विकसित केली जात आहे. कर्जत नगराध्यक्ष सुवर्णा जोशी, उपनगराध्यक्ष अशोक ओसवाल आणि मुख्याधिकारी डॉ. पंकज पाटील तसेच उपनगराध्यक्ष आणि सर्व सदस्यांनी पालिकेच्या कर्मचाऱ्यांना सोबत घेऊन नवीन उपक्रम यशस्वी केला आहे.

### आठ गार्डनचे लवकरच लोकार्पण

I ♥ KARJAT

कर्जत शहरात पूर्ण झाले... आठ कोपरा गार्डन चे लव... लोकार्पण होणार आहे. त... कर्जत शहरात प्रवेश कर... भिसेगाव खिंड, भिसेगाव... गजानन महाराज मंदिर, मुद्रे, कोतवाल नगर, महावीर पेठ, दिवाणी न्या... दहिवली डोबे हायस्कुल, दहिवली लहान पूल, पाटील आळी अशा ठिका... कोपरा गार्डन तयार असून लोकार्पणासाठी सज्ज आहेत.

## कर्जत नगरपरिषदेची ग्रीन कर्जतकडे वाटचाल सोलर पॅनल मधून होतोय विज पुरवठा विजेच्या बचतीसाठी एलईडी दिवे

**रायगड:कर्जत/प्रतिनिधी बाळू गुरव**

कर्जत नगरपरिषदेने आपल्या शहरातील तापमानात वाढ होऊ नये आणि शहरातील पर्यावरण राखले जावे यासाठी ग्रीन कर्जतचा नारा दिला आहे.त्यासाठी आधी स्वत:पासूनच सुरुवात केली आहे.शहरात आता विजेची बचत करणारे एलईडी दिवे बसविण्यात सुरुवात केली आहे.तर शहरातील चौक येथील विजेचे दिवे सोलरवर प्रकाशमान करण्यास सुरुवात केली आहे.तर कर्जत नगरपरिषदेने आपल्या कार्यालयातील वीज सोलर पॅनल चा प्रयोग करून वापरात आणली आहे.

शहरात जलसंवर्धन साठी विशेष मोहीम हाती घेण्यात आली असून शहरातील जुन्या आणि पुरातन विहिरींचे नूतनीकरण आणि सुशोभीकरण केले जाणार आहे.विहिरींची स्वच्छता करतानाच खोलीकरण आणि रंगरंगोटी तसेच माहिती पत्रक त्या ठिकाणी लावली जाणार आहे,हे नूतनीकरण मार्च महिन्यात पूर्ण केले जाणार असून सध्या त्या विहिरींमध्ये असलेल्या पाण्याचा वापर झाल्यावर ती कामे पूर्ण केली जाणार आहेत.रेन वॉटर हार्वेस्टिंग साठी पालिकेने तयारी केली असून शहरातील गार्डन मध्ये पालिका असा प्रयोग करणार असून नंतर तो खासगी बांधकाम व्यवसायिक यांच्यासाठी लागू करण्याचा प्रयत्न राहणार आहे.त्यासाठी जलसंवर्धन कार्यशाळा पालिकेने आयोजित केली होती.तर शहरात माझी वसुंधरा मित्र बनवले असून शहरात आजच्या घडीला 5000 हुन अधिकांनी वसुंधरेचे रक्षण करण्याची शपथ घेतली आहे.हे तरुण कर्जत शहरातील पर्यावरणाचा समतोल राखण्यासाठी नागरिकांना जागरूक करण्याचे काम करीत आहेत.त्याचवेळी झाडे लावण्याचे आणि कचरा कुठेही टाकू नये त्यांचे वर्गीकरण करुन त्यांचे कचरा गाडीत संकलन करण्यासाठी पुढाकार घेत आहेत.

कर्जत नगरपरिषदेच्या नगराध्यक्ष सुवर्णा जोशी आणि मुख्याधिकारी डॉ पंकज पाटील यांच्या संकल्पनेतून कर्जत नगरपरिषद कार्यालय आता वीज संपन्न झाले आहे. पालिकेच्या कार्यालयाच्या टेरेस वर पालिकेने स्वत:पासून सुरुवात करण्याचे उद्दिष्ट ठेवून पालिकेच्या टेरेस वर 30 किलो वॅट वीज निर्मिती करणारे सोलर पॅनल बसविले आहेत.त्यातून संपूर्ण कार्यालयाची वीज बचत होऊ लागली आहे.तर शहरातील विजेचे पथदिवे हे अपारंपरिक ऊर्जा च्या माध्यमातून आणि ग्रीन कर्जतच्या हेतूने एलईडी पध्दतीचे लावले गेले आहेत.शहरात आतापर्यंत 5000 एलईडी दिवे लागले असून 50 ठिकाणी सोलर पॅनल चौका चौकात बसविले आहेत.त्यातून शहराचे रात्रीच्या प्रकाशात रुपडे पालटण्यास मदत झाली आहे.आगामी काळात शहरातील सर्व ठिकाणी असलेल्या पथदिव्यांवर एलईडी दिवे लावण्यात येणार आहेत.

या सर्व प्रकल्प यामुळे कर्जत शहर ग्रीन कर्जत आणि पर्यावरण स्नेही कर्जत बनविण्यासाठी वाटचाल सुरु आहे. नागरिकांना पर्यावरण राखण्याचे आवाहन आम्ही करीत असून नागरिक देखील तितकाच प्रतिसाद देत आहेत.

**डॉ.पंकज पाटील - मुख्याधिकारी**





# सप्तसूत्री कातकरी उत्थान अभियानाची..!







पनवेल मधील क्रांतीवीर वासुदेव बळवंत फडके नाट्यगृह येथे जिल्हाधिकारी कार्यालय रायगड-अलिबाग यांच्या विद्यमाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव निमित्ताने जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतील ''कातकरी उत्थान'' अभियानांतर्गत ''सप्तसूत्री'' कार्यक्रमाद्वारे विविध योजनांचा लाभ वाटप कार्यक्रम संपन्न झाला. या कार्यक्रमास मार्गदर्शन करताना कोकण विभागीय आयुक्त श्री.विलास पाटील

रायगड जिल्हा हा पश्चिमेकडील अरबी समुद्र व पूर्वेकडील सह्याद्रीच्या डोंगररांगा यामुळे भौगोलिकदृष्ट्या वैशिष्ट्यपूर्ण आहे. रायगड जिल्ह्याच्या एकूण लोकसंख्येपैकी ११.५८% लोकसंख्या आदिवासी बांधवांची आहे. यापैकी ४०% लोकसंख्या कातकरी बांधवांची आहे. शासन स्तरावरुन आदिवासींचा आर्थिक, सामाजिक विकास करण्याकरीता अनेक योजना राबविल्या जातात. परंतु तरीही, आदिवासी बांधव अनेक सोयी-सुविधांपासून वंचित आहेत. रायगड जिल्ह्यामध्ये आदिवासी बांधवांचा सर्वांगीण विकास साधण्याच्या दृष्टीकोनातून जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून एक सप्तसूत्री निश्चित करण्यात आली आहे व त्या माध्यमातून आदिवासींच्या कल्याणकारी योजनांचे मार्गदर्शन व नियंत्रण केले जात आहे.

आदिवासी बांधवांकरिता अस्तित्वात असलेल्या सर्व योजनांचा लाभ त्यांना मिळण्याकरिता शासनाच्या सर्व विभागांचा समन्वय असणे आवश्यक आहे. याकरिता जिल्हास्तरावर जिल्हा आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती, तालुकास्तरावर तालुका आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती'' व ग्रामपंचायत स्तरावर ''ग्राम आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती'' या ३ समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

समितीची रचना पुढील प्रमाणे:-

**१. जिल्हा आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती:**

अध्यक्ष:- जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी उपाध्यक्ष:- मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड जिल्हा परिषद सदस्य:- पोलीस अधीक्षक, रायगड उपवनसंरक्षक अलिबाग/रोहा, जिल्हा शल्यचिकित्सक/ जिल्हा आरोग्य अधिकारी रायगड, जिल्हा अधीक्षक, कृषी अधिकारी रायगड, उपजिल्हाधिकारी (सामान्य प्रशासन) जिल्हाधिकारी कार्यालय रायगड

सदस्य सचिव:- प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प पेण

**२.तालुका आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती:**

अध्यक्ष:- उपविभागीय अधिकारी

उपाध्यक्ष:- उपविभागीय पोलिस अधिकारी

सदस्य:- गटविकास अधिकारी पंचायत समिती, पंचायत समिती सदस्य (अनुसूचित जमाती), तालुका आरोग्य अधिकारी, अशासकीय संस्था प्रतिनिधी (NGO), तालुका कृषी अधिकारी, परिक्षेत्र वन अधिकारी, पोलीस निरीक्षक

सदस्य सचिव:- सहाय्यक प्रकल्प अधिकारी

सह सदस्य सचिव:- तहसिलदार

**३.ग्राम आदिवासी कल्याणकारी समन्वय समिती:**

अध्यक्ष:- सरपंच

उपाध्यक्ष:- अनुसूचित जमाती प्रतिनिधी

सदस्य:- मुख्याध्यापक जिल्हा परिषद शाळा, आशा सेविका, अंगणवाडी सेविका, तलाठी, कृषी सहाय्यक

सदस्य सचिव:- ग्रामसेवक

आदिवासींच्या कल्याणाकरिता स्वयंसेवी संस्थानसमाविष्ट करुन घेण्यात आले आहे. या समितीमार्फत आदिवासी कल्याणाच्या योजनांना गती देणे व यानुषंगाने सामाजिक संस्थांना येणाऱ्या अडचणींवर मार्ग काढण्याचे काम करण्यात येत आहे.

**कातकरी उत्थान अभियानाची सप्तसूत्री:**

**१. आरोग्य / बालविवाह रोखणे-**

आदिवासी समाजामध्ये बाल विवाहाची परंपरा आहे. यामुळे महिलांच्या आरोग्यविषयक समस्या निर्माण झालेल्या आहेत. तसेच, बाल कुपोषण सारख्या समस्यादेखील याच कारणामुळे उद्भवतात. या दृष्टीकोनातून जिल्ह्यामध्ये एकही बालविवाह



स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

होणार नाही, याकरीता प्रयत्न करण्यात येत आहेत. त्याचबरोबर लसीकरणाची विशेष मोहिम हाती घेवून, आदिवासींचे १००% लसीकरण साध्य करण्यासाठी प्रशासन प्रयत्नशील आहे. माता व बाळ मृत्यूदर कमी करण्याबाबत नियोजन करण्यात येत आहे. आदिवासी बालकांचे कुपोषणावर मात करण्याच्या अनुषंगाने प्रयत्न करण्यात येत आहेत. आदिवासी वाड्यांवर आरोग्य तपासणी शिबिराचे आयोजन करण्यात येत आहे.

### २. कृषी विषयक योजनांची माहिती व अंमलबजावणी करणे.

जिल्हास्तरावर मंजूर वैयक्तिक पट्टेधारकांना व आदिवासी शेतकऱ्यांना सिंचन, भूविकास, अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर, शेतीचे यांत्रिकीकरण तसेच कापणीनंतरच्या पायाभूत सुविधा निर्माण, शेती विविधीकरण, शेळी पालन, कुक्कुटपालन इत्यादी करण्यासाठी कृषी, आदिवासी विकास प्रकल्प, समाजकल्याण, जिल्हा परिषद या विविध विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे अभिसरण करुन त्याचे फायदे देण्यासाठी नियोजन करण्यात येत आहे.

### ३. स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण व अभ्यासिका / ग्रंथालय

जिल्हा प्रशासनामार्फत पेण तसेच इतर तालुक्यांच्या ठिकाणी स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण वर्ग सुरु करण्यात आले आहे. या माध्यमातून जिल्ह्यातील आदिवासी बांधवांनाही स्पर्धा परिक्षांकरीता लागणारे प्रशिक्षण देण्यात येत आहे.

सुधागड-पाली तालुका आदिवासीबहुल असल्यामुळे त्या ठिकाणी पोलीस भरती प्रशिक्षण केंद्र व सैन्य भरती प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यात आले आहे. तसेच, सुधागड तालुक्यामध्ये परिचारिका प्रशिक्षण, गवंडी प्रशिक्षण, वाहन चालक प्रशिक्षण इत्यादी रोजगार पूरक प्रशिक्षण वर्ग सुरु करण्याचे नियोजन करण्यात आले आहे.

### ४. सर्व प्रकारच्या दाखल्यांचे वाटप

जिल्ह्यामध्ये जातीचे दाखले, उत्पन्नाचे दाखले इत्यादी दाखल्यांचे वाटप करण्यात आले असून उर्वरीत सर्व आदिवासी बांधवांना आवश्यक असलेले सर्व प्रकारचे दाखले देण्याबाबतचे नियोजन तालुका स्तरावर शिबिरांचे आयोजन करुन करण्यात येत आहे.

### ५. रेशन कार्ड / आधार कार्ड वाटप

अनेक आदिवासी बांधवांकडे रेशनकार्ड नाहीत किंवा ते फाटलेले आहेत. त्यांच्याकरिता विशेष शिबिरांचे आयोजन करुन रेशनकार्ड व आधारकार्ड यांचे वाटप करण्यात येत आहे.

### ६. स्थलांतरण थांबविणे व रोजगार निर्मिती

रायगड जिल्ह्यामधील आदिवासीबहुल भागामधील लोक रोजगार मिळण्याकरीता शहरामध्ये स्थलांतरीत होत आहेत. तरी अशा आदिवासी बांधवांना त्यांच्या निवासी पत्त्याजवळच रोजगार कसा उपलब्ध होईल, त्या दृष्टीकोनातून उपाययोजना करण्यात येत आहेत.

तालुकास्तरीय समितीने ग्रामस्तरीय समितीस मार्गदर्शन करणे व त्यानुषंगाने उद्भवणाऱ्या समस्यांचे निराकरण करणे अपेक्षित आहे. आदिवासी मजूरांना विशेष मोहीम हाती घेऊन जॉब कार्ड उपलब्ध करुन देण्यासाठी तसेच त्यांना राहत्या ठिकाणापासून जवळ काम देण्याचेही जिल्हा प्रशासनाचे प्रयत्न सुरु आहेत.

### ७. वनहक्क अधिनियम, २००६ ची अंमलबजावणी

आदिवासींचा वनांवर असलेला वैयक्तिक किंवा सामूहिक हक्क मान्य करणे. आदिवासी कातकरी समाजातील व्यक्तींना देण्यात आलेल्या दळी जमीन आणि पट्टा जमिनीच्या अधिकार अभिलेखात त्यांची स्वतंत्र नावे दाखल करणे. कातकरी व्यक्तींच्या शासकीय / खाजगी / गावठाण जमिनीवरील घराखालील जागा नावे करण्यासाठी नियमोचीत कार्यवाही करण्याचे निश्चित झाले आहे.

आदिवासी समाजाला खऱ्या अर्थाने मुख्य प्रवाहात आणण्याकरिता अशासकीय संस्थांनी मोठ्या प्रमाणात मदत केली आहे. जिल्हास्तरीय समितीमध्ये आदिवासींचे कल्याण करण्याकरिता जिल्ह्यामध्ये काम करणाऱ्या खालील अशासकीय संस्थांच्या प्रतिनिधींचा समावेश करण्यात आला आहे.

१. श्रमिक क्रांती संघटना, खालापूर
२. सर्वहरा जन आंदोलन, माणगाव
३. आदिवासी कातकरी समाज संघटना, अलिबाग
४. साकव स्वयसेवी संस्था, पेण
५. अंकुर स्वंयसेवी संस्था, पेण
६. सर्व विकास दीप संस्था, माणगाव
७. जागृत कष्टकरी संघटना, कर्जत
८. आदिवासी विकास सेवा संघ, मुरुड
९. अमरदिप संस्था मोर्बा रोड, माणगाव
१०. वनवासी कल्याण आश्रम महाराष्ट्र प्रांत, म्हसळा
११. आदिवासी श्रमजिवी संघटना, खालापूर
१२. कष्टकरी मुक्ती संघटना, आदिवासी भवन संस्था, खालापूर

या अशासकीय संस्थांच्या सहकार्याने आदिवासीच्या कल्याणासाठी निश्चित केलेल्या सप्तसूत्रीच्या अनुषंगाने कालबध्द कार्यक्रम आखण्यात आला आहे. त्याप्रमाणे कातकरी उत्थान अभियान अंतर्गत सप्तसूत्री कार्यक्रमाची अंमलबजावणी १००% होईल, या दृष्टीने जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली जिल्हा प्रशासनाकडून कसोशीने प्रयत्न केले जात आहेत.

**मनोज शिवाजी सानप**
जिल्हा माहिती अधिकारी
रायगड-अलिबाग



# प्रजासत्ताक दिनी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी जपले कातकरी बांधवांशी ऋणानुबंध






जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी कातकरी बांधवांशी असलेले ऋणानुबंध अनोख्या पद्धतीने व्यक्त केले अन् जपलेही. रोहा तालुक्यातील मढाळी बुद्रुक या कातकरी वस्तीवर जाऊन जिल्हाधिकारी डॉ. कल्याणकर यांनी चक्क कातकरी कुटुंबात स्नेहभोजन केले.

यावेळी त्यांच्या सोबत अलिबाग उपवनसंरक्षक आशिष ठाकरे, रोहा प्रांताधिकारी डॉ. यशवंत माने, तहसिलदार कविता जाधव, गट विकास अधिकारी अनिकेत पाटील, कोलाड पोलीस निरीक्षक श्री.जाधव, तालुका वैद्यकीय अधिकारी डॉ. ससाणे हे उपस्थित होते.

## कातकरी समाजाच्या विकासाची नाळ शिक्षणाशीच जोडली जावी, त्यासाठी कायम कटिबद्ध



जिल्हाधिकारी कार्यालयाच्या सहकार्याने ठाणे सिटीझन्स फाऊंडेशन, महाराष्ट्र गो ग्रीन फाऊंडेशन यांच्या संयुक्त विद्यमाने स्नेहवर्धिनी सोशल ट्रस्टने रोहा तालुक्यातील मढाळी बुद्रुक या कातकरी वस्तीतील २६ विद्यार्थ्यांना सायकल उपलब्ध करून दिल्या. यावेळी अलिबाग उपवनसंरक्षक आशिष ठाकरे, रोहा प्रांताधिकारी डॉ.यशवंत माने, तहसिलदार कविता जाधव, गटविकास अधिकारी अनिकेत पाटील, पोलिस निरीक्षक श्री. जाधव, तालुका वैद्यकीय अधिकारी डॉ.ससाणे, ठाणे सिटीझन्स फाऊंडेशनचे अध्यक्ष श्री.कॅसबर ऑगस्टीन,स्नेहवर्धिनी सोशल ट्रस्टचे फादर रुडॉल्फ अँड्रेड्स, मॉन्टे सिस्टर व कातकरी बांधव उपस्थित होते.








# आदिवासी कातकरी समाजाच्या उत्थानाची जबाबदारी सर्वांची

**- विभागीय आयुक्त विलास पाटील**






पनवेल मधील क्रांतीवीर वासुदेव बळवंत फडके नाट्यगृह येथे जिल्हाधिकारी कार्यालय रायगड-अलिबाग यांच्या विद्यमाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव निमित्ताने जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतील ''कातकरी उत्थान'' अभियानांतर्गत ''सप्तसूत्री'' कार्यक्रमाद्वारे विविध योजनांचा लाभ वाटप कार्यक्रम संपन्न झाला.

या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कोकण विभागीय आयुक्त श्री.विलास पाटील हे होते तर जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर, अलिबाग उपवनसंरक्षक आशिष ठाकरे आणि पनवेल महानगरपालिका आयुक्त गणेश देशमुख यांच्या हस्ते हे लाभ वाटप करण्यात आले.

यावेळी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेणच्या प्रकल्प अधिकारी शशिकला अहिरराव, पनवेल उपविभागीय अधिकारी राहुल मुंडके, कर्जत उपविभागीय अधिकारी अजित नैराळे, श्रीवर्धन उपविभागीय अधिकारी अमित शेडगे, पनवेल तहसिलदार विजय तळेकर, कर्जत तहसिलदार विक्रम देशमुख, खालापूर तहसिलदार आयुब तांबोळी, उरण तहसिलदार भाऊसाहेब अंधारे, गटविकास अधिकारी संजय भोये, तालुका कृषी अधिकारी श्री.चौधरी, जिल्हा परिविक्षा अधिकारी अशोक पाटील, बाल संरक्षण अधिकारी चेतन गायकवाड, तहसील कार्यालयाचे विनोद लचके व इतर अधिकारी-कर्मचारी यांची उपस्थिती होती.





प्रदर्शनीय दालनाची पाहणी करताना मान्यवर






मान्यवरांच्या हस्ते अदिवासी बांधवांना विविध योजनांचा लाभ देण्यात आला



# ‘सप्तसूत्री‘‘ कार्यक्रमाद्वारे विविध योजनांचा लाभ वाटप







मान्यवरांच्या हस्ते लाभार्थ्यांना पोषण पोटलीचे वाटप



मान्यवरांच्या हस्ते लाभार्थ्यांना घरकुल लाभ वाटप




मान्यवरांच्या हस्ते लाभार्थ्यांना बालसंगोपन योजना व बेबी केअर किट लाभ वाटप



लाभ मिळाल्यानंतर लाभार्थ्यांच्या चेहऱ्यावरील हास्य




मान्यवरांच्या हस्ते लाभार्थ्यांना नव मतदारांना मतदार ओळखपत्र वाटप



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल
## अलिबाग




कातकरी उत्थान अभियानांतर्गत मौजे सारळ, आदिवासीवाडी येथे जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली अलिबाग तहसिलदार श्रीमती मीनल दळवी यांच्या उपस्थितीत आदिवासी बांधवांना शिधापत्रिका, वय अधिवास, उत्पन्न, बोनाफाईड दाखल्यांचे वितरण केले. तसेच महसूल व कृषी विभागाच्या विविध योजनांबाबत माहिती देण्यात आली.



### आरोग्य शिबिर

आदिवासी कातकरी उत्थान कार्यक्रमांतर्गत मौजे सारळ, दत्तपाडा आदिवासीवाडी येथे तहसिलदार श्रीमती मीनल दळवी यांच्या उपस्थितीत आदिवासी महिलांचे मोफत आरोग्य तपासणी शिबीर आयोजित करण्यात आले होते.



**अलिबाग तालुक्यातील मौजे वाघोडे येथील चंदरवाडी आदिवासी वाडी येथे कातकरी समाजासाठी कातकरी उत्थान अभियानांतर्गत आरोग्य शिबीर, दाखले वाटप, वृक्षारोपण ई. विविध शासकीय योजनांची माहिती व मार्गदर्शन करण्यासाठी कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. यावेळी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, प्रांताधिकारी प्रशांत ढगे, तहसिलदार श्रीम.मीनल दळवी यांच्याकडून विविध शासकीय योजनांची माहिती देण्यात आली.**




या शिबिरास १०१ आदिवासी बांधवांची मोफत आरोग्य तपासणी व औषधोपचार करण्यात आले. तसेच ज्यांना पुढील उपचाराकरिता आवश्यकता भासेल त्यांना महसूल विभागातर्फे पुढील उपचाराकरिता मदत करण्याबाबत आश्वासित करण्यात आले.

अलिबाग उपविभागीय अधिकारी श्री.प्रशांत ढगे यांच्या नेतृत्वाखाली आदिवासी कातकरी उत्थान अभियानांतर्गत किहीम आदिवासी वाडी येथे माणुसकी प्रतिष्ठान व लाईफ फाऊंडेशन यांच्या सहकार्याने मोफत आरोग्य शिबीर व शासकीय योजनांची माहिती/मार्गदर्शन कार्यक्रम संपन्न झाला.

### आदिवासी होतकरू विद्यार्थ्यांचा सत्कार

किहीम आदिवासी वाडी येथील होतकरू विद्यार्थी कु.समीर दत्तू नाईक याने अतिशय प्रतिकूल परिस्थितीत प्राथमिक शिक्षण किहीम येथे पूर्ण केले. पुढील अभियांत्रिकी शिक्षणासाठी VIT (PUNE) पुणे येथे त्याची निवड झाल्याबद्दल तहसिलदार अलिबाग श्रीम.मिनल दळवी यांच्या हस्ते त्याचा सत्कार करण्यात आला. तसेच पुढील शिक्षणासाठी शुभेच्छा देऊन महसूल प्रशासनाकडून सर्वोतोपरी मदत करण्याबाबत आश्वासित करण्यात आले.




**अलिबाग तालुक्यातील कातकरी बांधवांना दाखले वाटप करताना उपविभागीय अधिकारी प्रशांत ढगे, तहसिलदार मीनल दळवी व अन्य अधिकारी**



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल कर्जत










**कातकरी उत्थान कार्यक्रमांतर्गत आमदार महेंद्र थोरवे यांच्या हस्ते २१ कातकरी लाभार्थ्यांना राष्ट्रीय कुटुंब अर्थसहाय्य योजनेंतर्गत धनादेश वितरण करण्यात आले, यावेळी कर्जत तहसिलदार विक्रम देशमुख उपस्थित होते.**

सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत मौजे पाथरज येथे पोषण पोटली चे वाटप करण्यात आले. तसेच कर्जत तालुक्यात अन्नदा संस्थेच्या मदतीने एकूण १ हजार ५०० पोषण पोटली किट आदिवासी महिलांना वाटप करण्यात आल्या व या पोषण पोटलीचा योग्य वापर करण्याबाबत त्या महिलांना प्रशिक्षण देण्यात आले.




मौजे कोल्हारे तालुका कर्जत येथे आदिवासी महिला व पुरुष यांच्या डोळ्यांची मोफत तपासणी शिबीर घेऊन मोफत चष्मे वाटप करण्यात आले. तसेच या कार्यक्रमात ५६८ दाखले, ९२ आधारकार्ड, १९३ रेशनकार्ड वाटप करण्यात आले. मौजे कर्जत येथे ४८७ लाभार्थ्यांना विविध दाखल्यांचे तसेच ९८ लाभार्थ्यांना रेशनकार्डचे वाटप करण्यात आले.



आदिवासी कातकरी महिलांना व मुलींना Empowerindia या सामाजिक संस्थेच्या मदतीने




स्वरक्षणाचे प्रशिक्षण मौजे कवठेवाडी तालुका कर्जत येथे देण्यात आले. या प्रशिक्षणाद्वारे ५४ ग्रामपंचायतीत प्रशिक्षण देण्याकरिता प्रशिक्षकांना प्रशिक्षित करण्यात आले. हे प्रशिक्षक प्रत्येक ग्रामपंचायतीत जाऊन आदिवासी कातकरी महिलांना व मुलींना प्रशिक्षण देणार आहेत.



कर्जत तालुक्यातील विद्यार्थ्यांसाठी गरुडझेप स्पर्धा परिक्षा केंद्राच्या माध्यमातून स्पर्धा परीक्षेबाबत मार्गदर्शन शिबीर घेण्यात आले. या शिबिराचा ३२६ विद्यार्थ्यांनी लाभ घेतला.

कर्जत येथे आदिवासी बांधवांकरिता इनरव्हिल क्लबच्या मदतीने मोफत आरोग्य शिबीर घेण्यात आले. या शिबिराचा ४६० लाभार्थ्यांनी लाभ घेतला.



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल तळा




तळा तालुका दुर्गम व डोंगरी असून लोकसंख्या अंदाजे ४२ हजार इतकी आहे. तळा तालुक्यात एकूण ६९ महसूली गावे असून २२ आदिवासीवाडी, पाडे आहेत. डोंगराच्या कडेकपाऱ्यात आदिवासी वाड्या, पाडे असून समाजाच्या मुख्य प्रवाहापासून काही अंशी अलिप्त आहेत. शैक्षणिक, आरोग्य व इतर सुविधांपासून अलिप्त असलेल्या आदिवासी समाजाला प्रवाहाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली कातकरी उत्थान अभियानांतर्गत सप्तसूत्रीच्या माध्यमातून तळा तालुक्यात विविध उपक्रम राबविण्यात आले.

यामध्ये प्रथमत: तालुक्यातील सर्व २२ आदिवासी वाड्यांचे सर्वेक्षण करण्यात आले. कुटुंबनिहाय माहिती संकलित करण्यात आली. प्रत्येक आदिवासी वाडीतील प्रत्येक कुटुंबातील व्यक्तीची शैक्षणिक आरोग्याची स्थिती, उदरनिर्वाहाच्या गरजा इ. माहिती एकत्रित करून शिबीराचे आयोजन करण्यात आले.

तळा तालुक्यातील एकूण आदिवासी वाड्यांवर



आरोग्य तपासणी व उपचार शिबीर, विविध दाखले वाटप, संजय गांधी निराधार योजना, स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन व प्रशिक्षण माहिती, कृषी व इतर योजनांची माहिती, बालविवाह थांबविणे तसेच त्याबाबतचे समुपदेशन, स्थलांतर थांबविण्यासाठी रोजगार निर्मिती व त्यासंबंधीच्या योजनांची माहिती, ई-श्रम कार्ड वाटप, उत्पन्न, जात प्रमाणपत्र व अधिवास दाखले वाटप, रेशनकार्ड वाटप, आधारकार्ड नोंदणी, घरकूल योजनांची माहिती, पेन्शन योजनांचे फॉर्म भरून घेणे, वन हक्क दावे अंतर्गत विविध विभागाकडील योजनांचा लाभ, फळबाग लागवड, मृदपरिक्षण असे विविध उपक्रम राबविण्यात आले.

आरोग्य तपासणी शिबिरात मोतीबिंदू, गरोदर माता, मलेरिया, कोविड-१९ अंतर्गत लसीकरण, उच्च रक्तदाबावर उपचार, रक्त तपासणी, क्षयरोग निदान, उच्च रक्तदाब निदान, स्त्रीरोग निदान, सिकलसेल निदान व निदान झालेल्या रुग्णांवर उपचार, तसेच विविध प्रकारच्या वैद्यकीय तपासण्या आणि त्यावरील औषधोपचार याबाबत मार्गदर्शन करण्यात आले.

तळा तालुक्यांतर्गत २२ आदिवासी वाड्यांवर एकूण



१८ शिबिरांचे आयोजन करण्यात आले. दाखले वाटपांतर्गत एकूण ३०० हून अधिक दाखले वितरीत करण्यात आले. यामध्ये शालेय उपयोगासाठी सर्व प्रकारच्या दाखल्यांचे वितरण करण्यात आले.

निराधार योजनेमध्ये ३५ हून अधिक नागरिकांचे फॉर्म



भरून घेण्यात आले. १५० हून अधिक ई-श्रम कार्डचे वाटप करण्यात आले. आधारकार्ड कॅम्प आयोजित करून २०० हून अधिक आदिवासी कातकरी बांधवांना आधारकार्ड तयार करण्यात आले.





# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल सुधागड - पाली







कातकरी उत्थान अभियान सप्तसूत्री अंतर्गत ड्रायव्हिंग लायसन्स देण्याचे चौथे शिबिर परळी सुधागड येथे स्वदेस फाउंडेशन मार्फत सुधागड मध्ये सुरू असणाऱ्या कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमांमधील विद्यार्थ्यांशी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी संवाद साधला. यावेळी प्रांताधिकारी डॉ.यशवंत माने, सुधागड तहसिलदार दिलीप रायण्णावार व गटविकास अधिकारी यादव व स्वदेस फाउंडेशनचे उपसंचालक तुषार इनामदार आदी उपस्थित होते.





सप्तसूत्री अंतर्गत सुधागड तालुक्यातील सर्व मुख्याध्यापकांची सभा घेण्यात आली. यामध्ये बालविवाह, शाळाबाह्य मुले, स्थलांतरण रोखणे या विषयांवर चर्चा करण्यात आली व उपाययोजना करण्याचे निश्चित करण्यात आले.






कातकरी उत्थान अभियान सप्तसूत्री अंतर्गत ड्रायव्हिंग लायसन्स देण्याचे चौथे शिबीर परळी सुधागड येथे संपन्न झाले, या शिबिराचा १०० कातकरी लाभार्थ्यांना लाभ मिळाला.



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल
## खालापूर









सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत वावोशी मंडळातील तलाठी सजा वावोशी, नारंगी, खानाव हद्दीत ११ आदिवासी वाड्यांवर विविध शिबिरांचे आयोजन करण्यात आले. यावेळी उपस्थित कर्जत उपविभागीय अधिकारी अजित नैराळे, तहसिलदार अयुब तांबोळी व इतर ...







खालापूर तालुक्यातील सर्व SAM व MAM बालकांना सरनोबत नेताजी पालकर सभागृह, खालापूर येथे पोषण आहार वितरण (पोषण पोटली) कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. यावेळी खालापूर तालुक्यातील ३०७ बालकांना पोषण आहार (पोषण पोटली) चे वितरण करण्यात आले.

## श्रीवर्धन






कातकरी उत्थान अभियान सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत श्रीवर्धन तालुक्यातील वडवली येथे कुडगाव व कार्ले येथील आदिवासी बांधवांसाठी शेती क्षेत्र भेटीचे आयोजन करण्यात आले. यावेळी उपस्थित श्रीवर्धन उपविभागीय अधिकारी अमित शेडगे, तहसिलदार सचिन गोसावी व इतर अधिकारी.



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल पोलादपूर




कातकरी उत्थान व सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत पोलादपूर तालुक्यातील पितळवाडी येथे शिबिर राबविण्यात आले. यामध्ये विविध प्रकारचे शासकीय दाखले, मनरेगा जॉब कार्ड संबंधीचे अर्ज घेऊन तयार दाखल्यांचे व रेशन कार्डचे वाटप करण्यात आले. आरोग्य शिबिरामध्ये आदिवासी बांधवांचे लसीकरण व रक्त तपासणी करण्यात आली.





महाड प्रांताधिकारी प्रतिमा पुदलवाड व तहसिलदार दिप्ती देसाई यांच्या पुढाकारातून पोलादपूर तालुक्यातील लोहारे गावात शिबिराचे आयोजन करण्यात आले. यावेळी मनरेगा जॉब कार्ड व रेशन कार्डचे वाटप करण्यात आले. आरोग्य शिबिरामध्ये आदिवासी बांधवांचे लसीकरण, नेत्र तपासणी आणि रक्त तपासणी करण्यात आली.







# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल पनवेल




जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली मौजे मोसारे व बारवई तालुका पनवेल येथे कातकरी उत्थान सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत आदिवासी बांधवांना कृषी योजनेसंदर्भात मार्गदर्शनपर कार्यक्रम दि १५ मार्च २०२२ रोजी आयोजित करण्यात आला.यावेळी तालुका कृषी




अधिकारी श्री. चौधरी यांनी सविस्तर मार्गदर्शन केले ,या कार्यक्रमाला वाडीमधील आदिवासी शेतकरी उपस्थित होते.

मौजे सुकापूर तालुका पनवेल / बालकांना पोषण आहार पोटली वाटप .

कातकरी उत्थान सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र वावंजे मार्फत फणसवाडी येथे आरोग्य तपासणी शिबिराचे आयोजन आले .



मौजे पोयंजेवाडी तालुका पनवेल येथे प्राथमिक आरोग्य केंद्र अजिवली, छत्रपती शिवाजी महाराज हॉस्पिटल शेडुंग व ग्रामपंचायत पोयंजे यांच्या संयुक्त विद्यमाने आरोग्य शिबीर घेण्यात आले. आरोग्य शिबिरात १०३ कातकरी बांधवांनी आपल्या आरोग्याची तपासणी करून घेतली.

मौजे मालडुंगे टावरवाडी येते कातकरी उत्थान सप्तसूत्री कार्यक्रम आयोजित करण्यात आला, यां कार्यक्रमाला तालुका



कृषी अधिकारी श्री. चौधरी, कृषी पर्यवेक्षक श्री. दोलतोडे साहेब कृषी सहायक श्री. बिचुकले यांनी सविस्तर मार्गदर्शन केले. या कार्यक्रमाला गावातील आदिवासी शेतकरी उपस्थित होते.

प्राथमिक आरोग्य केंद्र वावजे येथे आदिवासी सप्तसूत्री आरोग्य शिबीर आयोजित करण्यात आले डायबेटिस



हेल्थ फाऊंडेशन चॅरिटेबल ट्रस्ट पनवेल व वैद्यकीय अधिकारी वावजे सर्व आरोग्य कर्मचारीवर्ग, आशा वर्कर्स अंगणवाडी सेविका शिक्षक हजर होते.

मौजे मालडुंगे तालुका पनवेल येथे आदिवासी बांधवांसाठी आरोग्य तपासणी शिबीर आयोजित करण्यात आले . यामध्ये हॉस्पिटल , तालुका आरोग्य अधिकारी , प्राथमिक आरोग्य केंद्र नेरे यामधील डॉक्टर व आरोग्य कर्मचारी यांचे साहाय्य लाभले .

मौजे– सारसई (बागेची वाडी) येथे कातकरी उत्थान सप्तसूत्री कार्यक्रमांतर्गत आदिवासी शेतकऱ्यांसाठी एक दिवसीय प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आला. या कार्यक्रमात तालुका कृषी अधिकारी श्री.आय डी. चौधरी, श्री.जगदीश भानुशाली, (आदिवासी प्रकल्प निरीक्षक,पेण,) श्री.मुकेश कांबळे (कृषी अधिकारी,पं. स. पनवेल) डॉ. प्रशांत पाचारणे ( आरोग्य अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र,सारसई, पनवेल) उपस्थित होते. शेतकरी/ग्रामस्थ यांना विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या विविध योजनांची माहिती देण्यात आली .

पनवेल तालुक्यामधील १ हजार ८५० कातकरी जातीचे दाखले तयार करण्यात आले असून त्याचे वाटप उपविभागीय अधिकारी श्री. राहुल मुंडके, तहसिलदार विजय तळेकर व इतर मान्यवरांच्या हस्ते आखाडावाडी मौजे कल्हे तालुका पनवेल येथून सुरुवात करण्यात आली .




पनवेल तालुक्यामधील कातकरी जातीचे दाखले वितरीत करताना पनवेल उपविभागीय अधिकारी श्री. राहुल मुंडके, तहसिलदार विजय तळेकर व इतर मान्यवर



# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल
## माणगाव








ग्रामीण अर्थकारणाला चालना देण्यासाठी आदिवासी महिलांना भविष्यात मातीची भांडी बनविण्याचे प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीकोनातून जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी माणगाव तालुक्यातील आकार वर्कशॉपला भेट देऊन या कलेविषयी माहिती घेतली.










माणगाव तालुक्यातील कातकरी बांधवाना प्रातिनिधिक स्वरूपात विविध शासकीय लाभांच्या प्रमाणपत्रांचे वाटप जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या हस्ते करण्यात आले. यावेळी माणगाव उपविभागीय अधिकारी प्रशाली दिघावकर, श्रीवर्धन उपविभागीय अधिकारी अमित शेडगे, माणगाव तहसिलदार प्रियांका आयरे व इतर अधिकारी उपस्थित होते.






# कातकरी उत्थान अभियानात जिल्ह्याची यशस्वी वाटचाल
# प्रसारमाध्यमांची उत्तम साथ...!

## जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली कातकरी उत्थान अभियान

अशोक गायकवाड





## जातीचे दाखले, रेशनकार्ड कॅम्पने वाडीवरील आदिवासी आनंदले

◆ वार्ताहर : चौक

खालापूर तहसील कार्यालय, उरण सामाजिक संस्था आणि पेण येथील एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्या संयुक्त विद्यमाने खालापूर तालुक्यातील वावर्ले ग्रुप ग्रामपंचायत क्षेत्रातील आदियासी वाड्यांवर आदियासींसाठी खासबाब म्हणून जातीचे दाखले आणि रेशन कार्ड कॅम्पचे आयोजन करण्यात आले होते. घरपोच दाखले मिळाल्याने वाडीवरील आदिवासींमध्ये समाधान व्यक्त होत आहे.

रविवार (१२ डिसेंबर) उप विभागीय अधिकारी अजित नैराळे, तहसीलदार आयुब तांबोळी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प अधिकारी शशिकला अहिरराव, नायब तहसीलदार कल्याणी मोहिते, नायब तहसीलदार जोगी यांच्या मार्गदर्शनाखाली वावरले ग्राम पंचायत क्षेत्रातील सहा कातकरी वाड्यांवर राहणाऱ्या कातकरी बांधवांचे जातीचे दाखले काढण्यासाठी कॅम्प घेण्यात आला होता. त्यात भिलवले वाडी, चिंच खांबला वाडी, पाली बुद्रुक वाडी, पाली नर्सरी वाडी, वावरले वाडी, वड विहीर वाडी वरील कातकरी बांधवांनी सहभाग घेतला. त्या कॅम्पमध्ये एकूण ४३९ कातकरी बांधवांचे जातीचे दाखले काढण्यासाठी फॉर्म्स भरून घेण्यात आले. पुढील ऑनलाईन प्रक्रियेची तयारी सेतू कार्यालयातील कर्मचाऱ्यांकडून करून घेण्यात आली. उप विभागीय अधिकारी नैराळे आणि तहसीलदार आयुब तांबोळी यांनी आगामी १५ दिवसात सर्व ४३९ दाखले काढून वाटप करण्याचे जाहीर केले.

पोलीस पाटील, अनंता ठोंबरे आणि मनोज गोरे अशा स्थानिक पंचांची फौज सकाळी नऊ वाजल्यापासून तत्परतेने हजर होती. या प्रक्रियेमध्ये सुसूत्रता आणली आणि शिस्तबद्धता राखून मोहीम फत्ते करण्यात आली. याकामी उरण सामाजिक संस्थेचे सरचिटणीस संतोष पवार, उपाध्यक्ष प्रा. राजेंद्र मढवी, दत्ता गोंधळी, नामदेव ठाकूर, संदीप म्हात्रे, रवी कातकरी, सुनील कातकरी, विलास कातकरी यांनी मोहीम यशस्वी केली.

## आदिवासी बांधवांना विविध दाखल्यांचे वाटप विविध ११४ दाखल्यांचे वाटप



## पनवेलमध्ये कातकरी उत्थान अभियानांतर्गत सप्तसूत्री कार्यक्रमाद्वारे विविध योजनांचा लाभ वाटप कार्यक्रम



## रायगडमध्ये कातकरी उत्थान अभियान सप्तसूत्री कार्यक्रम

## आदिवासी मेळावा, आरोग्य शिबीर



। मुरुड : तालुक्यातील शिघ्रे ग्रामपंचायत हद्दीतील अतिदुर्गम भागातील नागरिकांना स्थानिक पातळीवर आरोग्य सुविधा मिळाव्यात, याकरिता आदिवासी उत्थान अंतर्गत आरोग्य शिबिराचे आयोजन करण्यात आले आहेत. या शिबिराचा परिसरातील नागरिकांनी लाभ घ्यावा, असे आवाहन मुरुड तहसीलदार रोहन शिंदे यांनी केले.

यावेळी नायब तहसीलदार गोविंद कोटंबे, मंडळ अधिकारी विजय मापुस्कर, खुशाल राठोड, रुपेश रेवसकर, रेश्मा विरकुड, सपना वावडे,

### रायगड जिल्हयात आदिवासी उत्थान अभियांतर्गत वाटप केलेले विविध दाखले

| अ. क्र. | तपशील | एकूण |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | घेण्यात आलेल्या मेळाव्याची संख्या | १६७ |
| २ | जातीचे दाखले | १८१५४ |
| ३ | जेष्ठ नागरीक दाखले | ९९४ |
| ४ | वय अधिवास प्रमाणपत्र | २७७३ |
| ५ | उत्पन्नाचे प्रमाणपत्र | ६१६२ |
| ६ | रहिवास दाखला | २०१९ |
| ७ | आधार कार्ड नोंदणी | ४०८४ |
| ८ | मतदार नोंदणी | १००४१ |
| ९ | आरोग्य तपासणी करण्यात आलेल्या व्यक्तींची संख्या | १३३८७ |
| १० | रेशनकार्ड | ३४९७ |
| ११ | संजय गांधी योजना अर्ज भरून देणे | ८८२२ |
| १२ | मनरेगा जॉब कार्ड देणे | २३५७ |
| १३ | वनहक्क टायटलडीड | १३ |
| १४ | वनहक्क लाभार्थ्यांना वाटप केलेले ७/१२ | १२२२ |
| | **जिल्हा एकूण** | **६०१३८** |

## एक नावीन्यपूर्ण संकल्पना–

कोकणामधून प्रशासकीय सेवेत दाखल होणाऱ्या तरुणांची संख्या कमी आहे. देशाच्या आर्थिक राजधानीजवळ असूनही रायगड जिल्ह्यातून विविध स्पर्धा परीक्षांमधील सहभाग नगण्य आहे. यामागील मुख्य कारण म्हणजे स्पर्धा परीक्षांबाबत मार्गदर्शनाचा अभाव व अभ्यास साहित्याची अनुपलब्धता होय.

या अडचणींवर मात करुन रायगड जिल्ह्यातील होतकरु तरुणांना प्रशासकीय सेवेच्या रुपाने रोजगाराची नवी संधी उपलब्ध व्हावी, या उद्देशाने जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून नावीन्यपूर्ण योजनेअंतर्गत विविध स्पर्धा परीक्षांची तयार करणाऱ्या रायगड जिल्ह्यातील विद्यार्थ्यांसाठी गरुडझेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र दिनांक ०४ डिसेंबर २०२१ पासून जिल्ह्याचे मध्यवर्ती ठिकाण असलेल्या पेण येथे सुरु करण्यात आले आहे.

## गरुडझेपची उद्दिष्ट्ये–

- ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांचा कल स्पर्धा परीक्षांकडे वाढविणे.
- विद्यार्थ्यांची स्पर्धा परीक्षेची प्राथमिक तयारी करुन घेणे व योग्य दिशा देणे.
- दुर्बल घटकांमधील विद्यार्थ्यांना सर्व प्रकारच्या स्पर्धा परीक्षांसाठी सक्षम बनविणे.
- रायगड जिल्ह्यातील दर्जेदार व होतकरु तरुणांच्या गुणवत्तेला वाव देणे.
- स्पर्धा परीक्षांच्या मार्गदर्शनातून तरुणांचा प्रशासनातील वाटा वाढवून मानव संसाधनांचा विकास साधणे.

## भविष्यातील नियोजन–

- जिल्ह्यातील सर्व तहसिल कार्यालयांमध्ये पुस्तके व अभ्यास साहित्याचे संच उपलब्ध करुन दिले जाणार.
- त्यासाठी तहसिल स्तरावर ग्रंथालयाची स्थापना केली जाणार.
- विद्यार्थ्यांचा प्रतिसाद पाहून पेण येथील मार्गदर्शन केंद्राच्या धर्तीवर रायगड जिल्ह्यातील सर्व पंधरा तालुक्यांमध्ये स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र सुरु करणार.
- वाडी–वस्त्यांवर राहणाऱ्या आदिवासी युवकांच्या अडचणी लक्षात घेऊन त्यांना नजीकच्या तलाठी सजा कार्यालयामध्ये मार्गदर्शनाची सोय उपलब्ध करुन देणार.
- पाली येथे पोलीस भरती मार्गदर्शन केंद्राची स्थापना करण्याचे नियोजन.

## संपूर्ण जिल्ह्याचा सहभाग–

गरुडझेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र हे जिल्ह्याचे मध्यवर्ती ठिकाण असलेल्या पेण येथे कार्यरत आहे. रायगड जिल्ह्याचा मोठा विस्तार लक्षात घेता जिल्ह्यातील इतर तालुक्यांतील विद्यार्थ्यांना पेण येथे उपस्थित राहून मार्गदर्शन केंद्राचा लाभ घेण्यात येऊ शकणाऱ्या अडचणींचा विचार करुन जिल्हा प्रशासनाने इतर तालुक्यातील विद्यार्थ्यांना ते राहत असलेल्या तालुक्यातील तहसिल कार्यालयामध्ये दूरदृश्य प्रणालीच्या माध्यमातून पेण येथील केंद्रातून दिल्या जाणाऱ्या मार्गदर्शनाचा लाभ घेण्याची सुविधा उपलब्ध करुन दिली आहे. याकरिता जिल्ह्यातील सर्व तहसिल कार्यालयांनी आपले सभागृह या विद्यार्थ्यांसाठी खुले करुन ऑनलाईन प्रशिक्षणासाठी आवश्यक डिस्प्ले स्क्रीन, प्रोजेक्टर तसेच आसनव्यवस्था यांची सोय केली आहे. तालुक्यातील महाविद्यालयांशी उत्कृष्ट समन्वय साधून जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना या सुविधेचा लाभ देण्यासाठी प्रयत्न केला जात आहे.

## गरुडझेपची वैशिष्ट्ये–

- आठवड्यातून दोन दिवस (शनिवार व रविवार) खुले मार्गदर्शन शिबीर
- या शिबिरात प्रत्यक्ष प्रशासकीय सेवेत असलेल्या अधिकाऱ्यांकडून सोप्या भाषेत मार्गदर्शन.
- विद्यार्थ्यांना पुस्तके व संदर्भ साहित्याची उपलब्धता
- भरपूर सराव परीक्षांचे नियोजन
- प्रतिरुप मुलाखतींचे आयोजन
- दूरदृश्यप्रणालीद्वारे ऑनलाईन मार्गदर्शनाची सोय.
- **सर्व सुविधा नि:शुल्क**



**"गरुडझेप स्पर्धा परीक्षा ॲप" चे खासदार शरदचंद्रजी पवार यांच्या हस्ते उद्घाटन तसेच या ॲपच्या माहितीपर घडीपत्रिकेचे प्रकाशन संपन्न**

गरुडझेप- स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्रातून देण्यात येणाऱ्या मार्गदर्शनामध्ये स्थळ-काळ याची अडचण न येता विद्यार्थ्यांना त्यांच्या सोयीच्या ठिकाणी व सोयीच्या वेळी मार्गदर्शनाचा लाभ घेता यावा, याकरिता जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून रायगड जिल्हा प्रशासनाने गरुडझेप हे ॲप विकसित केले आहे. हे ॲप ॲन्ड्रॉईड प्रणालीवर आधारीत असून प्ले-स्टोअर वर उपलब्ध करुन देण्यात आले आहे.




## या ॲपची वैशिष्ट्ये :

### व्याख्यानांचे व्हिडिओ कायमस्वरुपी उपलब्ध

गरुडझेप मार्गदर्शन केंद्राद्वारे दिली जाणारी व्याख्याने या ॲपद्वारे विद्यार्थ्यांना कायमस्वरुपी उपलब्ध राहणार आहेत. यामुळे काही अडचणींमुळे विद्यार्थ्यांना एखाद्या व्याख्यानाला उपस्थित राहणे शक्य झाले नसले तरी या ॲपच्या सुविधेमुळे ते मार्गदर्शनापासून वंचित राहणार नाहीत.

### अभ्यास साहित्य

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची इयत्ता पहिली ते बारावी पर्यंतची पुस्तके स्पर्धा परीक्षांच्या अभ्यासाचा पाया असून या ॲपद्वारे ही पुस्तके पीडीएफ स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या राज्यसेवा परीक्षा, पोलीस उपनिरीक्षक, सहायक, विक्रीकर निरीक्षक या पदांच्या परीक्षा, पोलीस भरती व रेल्वे भरती यांचेही अभ्यास साहित्य या ॲपमध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.

### बाह्य स्त्रोतांच्या लिंकही उपलब्ध

स्पर्धा परीक्षांच्या संबंधातील इतर स्त्रोतांमध्ये उपलब्ध असलेल्या मार्गदर्शनपर व्हिडिओंच्या लिंक संदर्भासाठी ॲपद्वारे उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत. यामुळे विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षेच्या तयारीसाठी अमर्याद स्त्रोत उपलब्ध झाले आहेत.












## सराव परीक्षा –

केलेल्या अभ्यासाचा आवाका जाणून घेण्यासाठी ॲपमध्ये सराव परीक्षांचीही व्यवस्था करण्यात आलेली आहे. ॲपद्वारे विद्यार्थी ऑनलाईन त्याचा निकालही जाणून घेऊ शकतो. तसेच या परीक्षांमधील कामगिरीचे विश्लेषणही या ॲपद्वारे केले जात असल्याने विद्यार्थ्याला आपली कच्ची बाजू समजून येण्यास मदत होते.

## बुद्धीला चालना देणाऱ्या खेळांचा समावेश –

अभ्यास करताना आलेला ताण कमी होऊन पुन्हा ताजेतवाने होण्यासाठी काही खेळांचा समावेशही या ॲपमध्ये करण्यात आला आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या बुद्धीला चालना मिळून एकाग्रता वाढण्यास निश्चितच मदत होणार आहे.
या सर्व वैशिष्ट्यांमुळे स्पर्धा परीक्षांची तयारी करु इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना या ॲपचा वापर स्पर्धा परीक्षेच्या अभ्यासासाठी फायदेशीर ठरणार आहे, हे मात्र नक्की!!!

# गरुडझेप स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन अभ्यासिकेचे उद्घाटन





जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या हस्ते माणगाव तहसिल कार्यालय येथे गरुडझेप स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन अभ्यासिकेचे उद्घाटन संपन्न झाले. यावेळी माणगाव उपविभागीय अधिकारी श्रीमती प्रशाली दिघावकर, श्रीवर्धन उपविभागीय अधिकारी अमित शेडगे, माणगाव तहसिलदार प्रियांका आयरे, तळा तहसिलदार अण्णाप्पा कलशेट्टी आदींची उपस्थिती होती.





खोपोली येथील गरूडझेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र, अभ्यासिका व ग्रंथालयाचे उद्घाटन जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या शुभहस्ते संपन्न झाले. यावेळी कर्जत उपविभागीय अधिकारी अजित नैराळे, खालापूर तहसिलदार अयुब तांबोळी व इतर अधिकारी उपस्थित होते.

## उरण नगरपरिषद माँसाहेब मीनाताई ठाकरे ग्रंथालयामध्ये गरुडझेप स्पर्धा परीक्षा अभ्यासिका सुरू





उरण नगरपरिषदेच्या माँसाहेब मीनाताई ठाकरे ग्रंथालय येथे गरूडझेप स्पर्धा परीक्षा अभ्यासिका केंद्राची स्थापना करण्यात आली. यासाठी तहसिलदार श्री.भाऊसाहेब अंधारे आणि मुख्याधिकारी श्री.संतोष माळी यांनी पुढाकार घेतला.

# गरुडझेप स्पर्धा परिक्षा केंद्र होत आहे विद्यार्थीप्रिय

रायगड जिल्हा स्पर्धा मार्गदर्शन केंद्र

गरुडझेप

गरुडझेप ॲप Download व नोंदणी गोषवारा

| अ.क्र. | तालुक्याचे नाव | महाविद्यालयाची संख्या | महाविद्यालयातील विद्यार्थी | | | App download केलेले विद्यार्थी संख्या | गरुडझेप प्रकल्पात नोंदणी अर्ज भरलेले विद्यार्थी | अभ्यासिका | ग्रंथालय | समन्वयक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | पदवीधर (UG) | पदव्युत्तर (PG) | एकूण | | | स्थळ | स्थळ | |
| 1 | उरण | 3 | 2778 | 0 | 2778 | | 347 | वीर वाजेकर कला विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय फुंडे<br>कोकण ज्ञानपीठ उरण कॉलेज ऑफ कॉमर्स आणि आर्ट्स उरण रायगड | मासाहेब मीनाताई ठाकरे ग्रंथालय नगरपालिका उरण | डॉ.श्री.संदीप घोडके<br>श्री.हनुमंत कृष्णा जगताप |
| 2 | पनवेल | 9 | 2079 | 46 | 2125 | | 1732 | अदिवासी मुलींचे शासकीय वसतिगृह पनवेल | अदिवासी मुलींचे शासकीय वसतिगृह पनवेल | श्रीम.भाग्यश्री दशरथ भोंडे |
| 3 | खालापूर | 6 | 578 | 73 | 651 | | 466 | सरनोबत नेताजी पालकर सभागृह,खालापूर | थोर साहित्यिक कै.र.वा.दिघे स्मारक व सभागृह,खालापूर | शेखर खोत<br>प्रतिक बापर्डेकर |
| 4 | कर्जत | 5 | 701 | 152 | 853 | 4660 | 493 | श्री.लक्ष्मीकांत सार्वजनिक वाचनालय कर्जत | श्री.लक्ष्मीकांत सार्वजनिक वाचनालय कर्जत | श्री.संतोष जांभळे |
| 5 | पेण | 2 | 1711 | 179 | 1890 | | 320 | ग्रंथालय,वाचन कक्ष दुसरा मजला भाऊसाहेब महाविद्यालय पेण | पेण एज्युकेशन सोसायटी भाऊसाहेब नेने महाविद्यालय,पेण | ज्योती रामा मारगल<br>हर्षला विलास घाडगे |
| 6 | अलिबाग | 3 | 2247 | 0 | 2247 | | 570 | तहसील कार्यालय अलिबाग | तहसील कार्यालय अलिबाग | सौरभ कोचरेकर<br>प्रतिक चव्हाण |
| 7 | मुरुड | 2 | 295 | 25 | 320 | | 250 | अंजुमन इस्लाम जंजिरा डिग्री कॉलेज,ऑफ सायन्स,मुरुड-जंजिरा | अंजुमन इस्लाम जंजिरा डिग्री कॉलेज,ऑफ सायन्स,मुरुड-जंजिरा | कबले अमर अ.रहीम<br>उल्डे तनझील तकीउल्लाह |
| 8 | रोहा | 4 | 640 | 121 | 761 | | 386 | डॉ.सी.डी.देशमुख ग्रंथालय रोहा-अष्टमी | डॉ.सी.डी.देशमुख ग्रंथालय रोहा-अष्टमी | श्रीम.वंदना रमेश शिंदे<br>प्रथमेश रोकडे |
| 9 | सुधागड | 1 | 730 | 185 | 915 | | 112 | पालीवाला महाविद्यालय पाली | पालीवाला महाविद्यालय पाली | विकास गडगे |
| 10 | माणगाव | 4 | 4296 | 298 | 4594 | | 668 | तहसील कार्यालय माणगाव | तहसील कार्यालय माणगाव | रविंद्र बावदाने |
| 11 | तळा | 3 | 829 | 0 | 829 | | 185 | तहसील कार्यालय तळा ,पहिला मजला | तहसील कार्यालय तळा | डॉ.दिवाकर धोंडू कदम<br>डॉ.विजय मधुकर सरोदे |
| 12 | श्रीवर्धन | 3 | 358 | 7 | 365 | | 365 | तहसील कार्यालय श्रीवर्धन | तहसील कार्यालय श्रीवर्धन | कु.श्रेयश जोशी<br>कु.अक्षिता भगत |
| 13 | म्हसळा | 1 | 280 | 70 | 350 | | 135 | सार्वजनिक वाचनालय म्हसळा | तहसील कार्यालय म्हसळा | प्राची माळी<br>अदिती मोहिते<br>आर्या काते |
| 14 | महाड | 3 | 1915 | 180 | 2095 | | 680 | उपविभागीय अधिकारी कार्यालय,महाड | उपविभागीय अधिकारी कार्यालय,महाड | अनिकेत बुटाला<br>अमृता साळवी<br>पूर्वा विक्रांत चक्रदेव<br>संभाजी महादेव ओकीरकर |
| 15 | पोलादपूर | 1 | 550 | 0 | 550 | | 106 | सुंदरराव मोरे महाविद्यालय पोलादपूर | सुंदरराव मोरे महाविद्यालय पोलादपूर | कु.नरे अभिषेक प्रदीप<br>कु जाधव तनिशा विवेक |
| | एकूण | 50 | 19987 | 1336 | 21323 | 4660 | 6815 | | | |

रायगड जिल्हा परीक्षा मार्गदर्शन केंद्र
गरुडझेप
FEEDBACK FORM

दिनांक :- 16/04/2022

१. विद्यार्थ्यांचे नाव :- निपती निवृत्ती कदम
२. संपूर्ण पत्ता :- मु.वानस्ते पो.ता. तळा जि.रायगड
३. महाविद्यालयाचे नाव :- द.ग. तटकरे कला-वाणिज्य महाविद्यालय

गरुडझेप अंतर्गत सहभागी झालेले व्याख्यान

४. व्याख्यात्याचे नाव :- श्रीमती. भाग्यश्री वडोरे
५. विषय :- पर्यावरण
६. दिनांक :- 16/04/2022.
७. व्याख्यान उपयुक्त वाटले का? :- होय
८. प्रतिक्रिया :- मा. डॉ. महेंद्र कल्याणकर, जिल्हाधिकारी-रायगड याच्या संकल्पनेतून साकारलेले, स्पर्धा परिक्षांची तयारी करणाऱ्या आम्हा विद्यार्थ्यांसाठी खरच लाभदायक असं 'गरुडझेप' आहे. भरंभार माहिती न देता परिक्षाभिमुख आवश्यक तेवढीच माहिती व सोप्या सरळ भाषेत असते.
मा. तहसिलदार साहेब-तळा यांनी देखील तहसील मध्ये आम्हा विद्यार्थ्यांना offline 'गरुडझेप' व्याख्यान व पुस्तके उपलब्ध करुन दिल्याबद्दल व योग्य मार्गदर्शन दिल्याबद्दल मी त्यांचे आभार व्यक्त करते.

विद्यार्थ्यांची स्वाक्षरी Kadam

गरुडझेप स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन

जिल्हाधिकारी कार्यालय रायगड - अलिबाग तसेच मा. जिल्हाधिकारी साहेब डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून सुरु करण्यात आलेल्या गरुडझेप मार्गदर्शन केंद्रा द्वारे संपुर्ण जिल्ह्यात दर शनिवारी-रविवारी मार्गदर्शन करण्यात येते.

या उपक्रमांत विविध प्रशासकिय क्षेत्रात काम करणारे यशस्वी अधिकारी यांच्यामार्फत विविध विषयानुसार नियमित मार्गदर्शन करण्यात येते.

MPSC/UPSC व इतर स्पर्धा परिक्षांविषयीची तयारी कशी करावी, मार्गदर्शक पुस्तके कोणती वापरावी त्यांचा विषयानुसार अभ्यास व वेळेचे नियोजन कसे करावे यासंबधी मार्गदर्शन केले जाते. त्यासाठी लागणारी पुस्तके आमच्या तालुक्यातील अभ्यासिकेमध्ये तहसिलदार कार्यालयामार्फत ठेवण्यात आलेली आहेत. त्याचा चांगला फायदा अभ्यास वाचन करण्यासाठी होतो.

या उपक्रमासाठी मेहनत घेणाऱ्या सर्व अधिकारी व कर्मचारी वर्गाचे मी आभार मानते.

नाव:- प्रिया मे. गणात्रा
अभिनव ज्ञान मंदिर व कनिष्ठ महाविद्यालय - कर्जत
Mo- 8976643139
P.M Ganatra

गरुडझेप ॲप
झेप उज्ज्वल भविष्याकडे

# गरुडझेप स्पर्धा परिक्षा केंद्राच्या उपक्रमास प्रसारमाध्यमांची भक्कम साथ

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

## 'गरुड झेप'चे मार्गदर्शन उपयुक्त

केंद्राची विद्यार्थ्यांमध्ये क्रेझ

४ हजार ३७० विद्यार्थ्यांकडून डाऊनलोड ॲप

। अलिबाग । प्रतिनिधी ।

स्पर्धा परीक्षेची तयारी करणाऱ्या रायगड जिल्ह्यातील विद्यार्थ्यांसाठी जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत गरुड झेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र साकारण्यात आले. या केंद्राच्या माध्यमातून महिन्यातील दर शनिवार व रविवारी स्पर्धा परिक्षेची तयारी करणाऱ्या विद्यार्थ्यांना शासकीय सेवेत उत्कृष्ट काम केलेल्या अधिकाऱ्यांचे मार्गदर्शन मिळते. आतापर्यंत जिल्ह्यातील ६ हजार ५४९ विद्यार्थ्यांनी या गरुडझेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्रात नोंदणी केली आहे. या मार्गदर्शन केंद्राची विद्यार्थ्यांमध्ये क्रेझ वाढत चालली असल्याचे दिसत आहे.

रायगड जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यातील तहसील कार्यालयात हे केंद्र सुरु करण्यात आले आहे. परंतू काही विद्यार्थ्यांना संबंधित स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्रावर पोहोचणे शक्य होत नसल्याने अशा विद्यार्थ्यांच्या अभ्यासात खंड पडू नये व स्पर्धा परिक्षेचा अभ्यास करणाऱ्या जिल्ह्यातील अधिकाधिक विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचण्यासाठी गरुडझेप ॲपची निर्मिती करण्यात आली. हे ॲप अत्यंत कमी कालावधीत विद्यार्थीप्रिय झाले असून आतापर्यंत जिल्ह्यातील ४ हजार २७० विद्यार्थ्यांनी हे ॲप डाऊनलोड केले आहे.

या मार्गदर्शन केंद्रामध्ये जिल्ह्याचे मध्यवर्ती ठिकाण असलेल्या पेण येथील भाऊसाहेब नेने कॉलेज हॉल येथे हे केंद्र सुरु झाले. कोविड-१९ मधील प्रतिबंधक उपाययोजनांमुळे विद्यार्थ्यांना पेण येथील या केंद्रावर हजर राहणे शक्य नव्हते. म्हणून अशा विद्यार्थ्यांसाठी ते राहत असणाऱ्या तालुक्यातील तहसीलमध्ये दूरदृष्यप्रणालीच्या माध्यमातून थेट प्रक्षेपणाद्वारे या मार्गदर्शनाचा लाभ घेण्याची सुविधा जिल्हा प्रशासनाकडून उपलब्ध करून देण्यात आली. त्याचाही प्रत्येक शनिवार व रविवार असे दोन दिवस सकाळ व दुपार अशा दोन अभ्यास सत्रांचा लाभ हे विद्यार्थी घेत आहेत. या स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्राद्वारे होणाऱ्या विनामूल्य मार्गदर्शनाचा लाभ जिल्ह्यातील अधिकाधिक युवक-युवतींनी घ्यावा, असे आवाहन जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी केले आहे.

**तालुकानिहाय विद्यार्थी संख्या:-**

उरण- ३३७, पनवेल- १ हजार ७३२, खालापूर-४६६, कर्जत-४९३, पेण-३२०, अलिबाग-५७०, मुरूड-२५०, रोहा-२५१, सुधागड-११२, माणगाव-६६८, तळा-१५९, श्रीवर्धन-२७०, म्हसळा-१३५, महाड-६८०, पोलादपूर- १०६

## जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून साकारलेले गरुड झेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र होत आहे विद्यार्थीप्रिय

### जिल्ह्यातील ४ हजार ३७० विद्यार्थ्यांनी डाऊनलोड केले गरुडझेप ॲप

**अलिबाग, दि.०१ (जिमाका):- स्पर्धा परीक्षेची तयारी करणाऱ्या रायगड जिल्ह्यातील विद्यार्थ्यांसाठी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेतून नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत दि.०४ डिसेंबर २०२१ रोजी गरुड झेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र साकारण्यात आले. या केंद्राच्या माध्यमातून महिन्यातील दर शनिवार व रविवारी स्पर्धा परिक्षेची तयारी करणाऱ्या विद्यार्थ्यांना शासकीय सेवेत उत्कृष्ट काम केलेल्या अधिकाऱ्यांचे मार्गदर्शन मिळते. आतापर्यंत जिल्ह्यातील ६ हजार ५४९ विद्यार्थ्यांनी या गरुडझेप स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्रात नोंदणी केली आहे.**

रायगड जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यातील तहसील कार्यालयात हे केंद्र सुरु करण्यात आले आहे. परंतू काही विद्यार्थ्यांना संबंधित स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्रावर पोहोचणे शक्य होत नसल्याने अशा विद्यार्थ्यांच्या अभ्यासात खंड पडू नये व स्पर्धा परिक्षेचा अभ्यास करणाऱ्या जिल्ह्यातील अधिकाधिक विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचण्यासाठी गरुडझेप ॲपची निर्मिती करण्यात आली. हे ॲप अत्यंत कमी कालावधीत विद्यार्थीप्रिय झाले असून आतापर्यंत जिल्ह्यातील ४ हजार २७० विद्यार्थ्यांनी हे ॲप डाऊनलोड केले आहे.

गरुडझेप स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्रात नोंदणी केलेले तालुकानिहाय विद्यार्थी संख्या:-

उरण- ३३७, पनवेल- १ हजार ७३२, खालापूर-४६६, कर्जत-४९३, पेण-३२०, अलिबाग-५७०, मुरूड-२५०, रोहा-२५१, सुधागड-११२, माणगाव-६६८, तळा-१५९, श्रीवर्धन-२७०, म्हसळा-१३५, महाड-६८०, पोलादपूर- १०६

या मार्गदर्शन केंद्रामध्ये जिल्ह्याचे मध्यवर्ती ठिकाण असलेल्या पेण येथील भाऊसाहेब नेने कॉलेज हॉल येथे हे केंद्र सुरु झाले. कोविड-१९ मधील प्रतिबंधक उपाययोजनांमुळे विद्यार्थ्यांना पेण येथील या केंद्रावर हजर राहणे शक्य नव्हते. म्हणून अशा विद्यार्थ्यांसाठी ते राहत असणाऱ्या तालुक्यातील तहसीलमध्ये दूरदृष्यप्रणालीच्या माध्यमातून थेट प्रक्षेपणाद्वारे या मार्गदर्शनाचा लाभ घेण्याची सुविधा जिल्हा प्रशासनाकडून उपलब्ध करून देण्यात आली. त्याचाही प्रत्येक शनिवार व रविवार असे दोन दिवस सकाळ व दुपार अशा दोन अभ्यास सत्रांचा लाभ हे विद्यार्थी घेत आहेत.

या स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्राद्वारे होणाऱ्या विनामूल्य मार्गदर्शनाचा लाभ जिल्ह्यातील अधिकाधिक युवक-युवतींनी घ्यावा, असे आवाहन जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी केले आहे.

## स्पर्धा परीक्षा मार्गदर्शनासाठी जिल्हा प्रशासनाचा पुढाकार

हर्षद कशाळकर, लोकसत्ता

लोकसत्ता चांगभलं

**अलिबाग :** प्रशासकीय सेवांमध्ये रायगड जिल्ह्यातील अधिकारी भावाने आढळतात. स्पर्धा परीक्षांबाबत मार्गदर्शनाचा अभाव यास प्रामुख्याने कारणीभूत ठरतो आहे. ही बाब लक्षात घेऊन जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांनी 'गरुडझेप' हा उपक्रम सुरू केला आहे. या उपक्रमाला रायगडकरांचा उदंड प्रतिसाद मिळत आहे. जिल्ह्यातील अधिकारी विद्यार्थ्यांना मोफत स्पर्धा परीक्षांचे मार्गदर्शन करत आहेत.

कोकणातील विद्यार्थ्यांचा स्पर्धा परीक्षांमध्ये फारसा सहभाग दिसून येत नाही. तुलनेत प्रशासकीय सेवेत कोकणातील विद्यार्थ्यांचे प्रमाण नगण्य असते. स्पर्धा परीक्षांसाठी आवश्यक मार्गदर्शनाचा ... लक्षात घेऊन जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांनी रायगड जिल्ह्यातील विद्यार्थ्यांसाठी 'गरुडझेप' उपक्रम सुरू ... स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन उपलब्ध करून दिले जात आहे. यात जिल्ह्यातील अधिकारी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करत ... साडेसहा हजार विद्यार्थ्यांनी आतापर्यंत नोंदणी केली आहे.

अल्पावधीतच हा उपक्रम झाला असल्याचे दिसून येत ... त्यामुळे सातत्यपूर्ण प्रयत्न आणि ... मार्गदर्शन मिळाले तर आगामी ... परीक्षांमध्ये जिल्ह्यातील मु... चांगले यश मिळू शकेल, ... विश्वास जिल्हा प्रशासनाला ... आहे.

**पेण येथे मध्यवर्ती मार्गदर्शन केंद्र**

पेण येथील भाऊसाहेब नेने कॉलेज हॉल येथे जिल्ह्याचे मध्यवर्ती मार्गदर्शन केंद्र सुरू झाले आहे. कोविड निर्बंधांमुळे विद्यार्थ्यांना पेण येथील या केंद्रावर हजर राहणे शक्य नव्हते, म्हणून अशा विद्यार्थ्यांसाठी ते राहत असणाऱ्या तालुक्यातील तहसीलमध्ये दूरदृश्यप्रणालीच्या माध्यमातून थेट प्रक्षेपणाद्वारे या मार्गदर्शनाचा लाभ घेण्याची सुविधा जिल्हा प्रशासनाकडून उपलब्ध करून देण्यात आली आहे.

> जिल्ह्यातील विद्यार्थ्यांचा स्पर्धा परीक्षांमध्ये सहभाग वाढावा या उद्देशाने हा उपक्रम सुरू करण्यात आला आहे. सहभागी होणाऱ्या विद्यार्थ्यांना विनामूल्य मार्गदर्शन दिले जात आहे. जास्तीत जास्त युवा-युवतींनी या उपक्रमाचा लाभ घ्यावा.
> - डॉ. महेंद्र कल्याणकर, जिल्हाधिकारी, रायगड

**स्पर्धा परीक्षा केंद्रात नोंदणी केलेल्या विद्यार्थ्यांची तालुकानिहाय संख्या**

उरण- ३३७, पनवेल- १,७३२, खालापूर- ४६६, कर्जत-४९३, पेण- ३२०, अलिबाग-५७०, मुरूड- २५०, रोहा- २५१, सुधागड- ११२, माणगाव- ६६८, तळा- १५९, श्रीवर्धन-२७०, म्हसळा- १३५, महाड-६८०, पोलादपूर- १०६

**मोबाइल ॲप**

जिल्हा प्रशासनाने प्र... तालुक्यात स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन ... सुरू केली आहेत. यात अधिकार... शनिवारी आणि रविवारी विद्या... मार्गदर्शन करत आहेत. याशिवाय विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केंद्रावर ... शक्य होणार नाही त्या विद्यार्थ्यां... गरुडझेप नावाचे मोबाइल ॲप्लिके... विकसित केले आहे. ॲप्लिकेशनच्या माध्यमा... दूरदृश्यप्रणालीच्या माध्यमातून वि... सहभागी होऊ शकत आहेत. शनि... आणि रविवार सकाळ आणि दु... अशा दोन सत्रांत या विद्या...

सामना

प्रत्येक तालुक्यात मोफत मार्गदर्शन केंद्र

## रायगडातील साडेपाच हजार विद्यार्थी घेणार यूपीएससी, एमपीएससीची 'भरारी'

**अभ्यासिका, पुस्तके, अधिकाऱ्यांचे मार्गदर्शन**

खालापूर, दि. २५ (सा.वा.) – स्पर्धा परीक्षेत यश मिळवून तहसीलदार, उपजिल्हाधिकारी तसेच क्लासवन अधिकारी बनण्याचे स्वप्न अनेक हुशार तरूण पाहात असतात. पण त्यांना योग्य मार्गदर्शन लाभले तरच हे स्वप्न प्रत्यक्षात साकार होऊ शकते. गोरगरीब व मध्यमवर्गीय विद्यार्थ्यांनाही त्याचा लाभ मिळावा यासाठी रायगड जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यात गरूडझेप स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र सुरू करण्यात आले आहे. त्यामार्फत सुसज्ज अभ्यासिका, पुस्तके व तज्ज्ञ अधिकारी मार्गदर्शन करीत असून साडेपाच हजार विद्यार्थ्यांनी नोंदणी केली आहे.

रायगडातील दुर्गम भागात ... घेतला. त्यानंतर नावीन्यपूर्ण योजनेंतर्गत ही केंद्रे साकारण्यात ...

## मीनाताई ठाकरे ग्रंथालयामध्ये गरुडझेप स्पर्धा परीक्षा अभ्यासिका सुरु

दै.वादळवारा

उरण, ५ एप्रिल (वार्ताहर) : उरण नगरपरिषदेचे माँसाहेब मीनाताई ठाकरे ग्रंथालय, येथे गरूडझेप स्पर्धा परीक्षा अभ्यासिका केंद्राची स्थापना गुढीपाडव्याच्या शुभमुहूर्तावर करण्यात आली. या अभ्यासिकेचे उद्घाटन तहसीलदार भाऊसाहेब अंधारे यांच्या शुभहस्ते करण्यात आले. याप्रसंगी तहसीलदार भाऊसाहेब अंधारे आणि मुख्याधिकारी संतोष माळी यांनी मार्गदर्शन केले.

या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन ग्रंथालयाचे ग्रंथपाल सामाजिक कार्यकर्ते संतोष पवार यांनी केले. या कार्यक्रमाला उरण कला व वाणिज्य महाविद्यालयातील विद्यार्थी, प्रसाद मांडेलकर तसेच तहसील कार्यालयाचे श्री सुरवाडे, उरण नगरपरिषदेचे आरोग्य निरीक्षक सुरेश तेजी, मुकादम, महेन्द्र साळवी, धनेश कासारे, ग्रंथालयाचे जयेश वत्सराज हे उपस्थित होते. कार्यक्रमाअंती विद्यार्थ्यांनी मान्यवरांचे आभार मानून ही अतिश... नामी ... दिल्या... केले.

## प्रशासकीय सेवेत लवकरच रायगडच्या तरुणांची 'गरूडझेप'

जयंत धुळप




# मुंबई-गोवा महामार्गाचे काम एका वर्षात पूर्ण करणार

## -केंद्रीय मंत्री नितीन गडकरी




रायगड जिल्ह्यातील १०३६.१५ कोटी किंमतीच्या १३१.८७ किलोमीटर लांबीच्या तीन महामार्ग प्रकल्पांचे लोकार्पण व ४३० कोटी किंमतीच्या ४२.३० किलोमीटर लांबीच्या महामार्ग प्रकल्पाचा भूमीपूजन सोहळा माणगाव-इंदापूर येथे श्री.नितीन गडकरी यांच्या हस्ते रिमोट कंट्रोलद्वारे संपन्न झाला.

यावेळी पालकमंत्री कु. आदिती तटकरे, खासदार सुनिल तटकरे, आमदार अनिकेत तटकरे, आमदार भरत गोगावले,आमदार रवींद्र पाटील, माजी पालकमंत्री आणि आमदार रवींद्र चव्हाण, जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर, सडक परिवहन आणि राजमार्ग मंत्रालय चे मुख्य अभियंता तथा क्षेत्रीय अधिकारी श्री.राजीव सिंह, राज्य महामार्गाचे मुख्य अभियंता संतोष शेलार, राष्ट्रीय महामार्गाच्या अधीक्षक अभियंता सुषमा गायकवाड, अप्पर पोलीस अधीक्षक श्री.अतुल झेंडे, श्री.जे. एम.म्हात्रे आदी मान्यवर उपस्थित होते.

**कोकणातील रस्ते आणि बंदर विकासाच्या माध्यमातून कोकण समृद्ध आणि संपन्न होणार, त्यासाठी येथील बंदरे आणि त्यांना जोडणाऱ्या रस्त्यांची भूमिका महत्वाची आहे. या पार्श्वभूमीवर आगामी एका वर्षाच्या आत प्राधान्याने मुंबई-गोवा राष्ट्रीय महामार्गाचे काम पूर्ण करणार असल्याचे प्रतिपादन रस्ते वाहतूक आणि महामार्ग केंद्रीय मंत्री श्री.नितीन गडकरी यांनी इंदापूर येथे केले.**



महामार्गाची माहिती घेताना मान्यवर



दीप प्रज्वलन करताना मान्यवर

# नागरिकांच्या आरोग्याचे रक्षण प्रथम कर्तव्य

**-मुख्यमंत्री उद्धव ठाकरे**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव






**अलिबाग तालुक्यातील उसर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालयाच्या प्रशासकीय इमारतीचा भूमीपूजन सोहळा दूरदृष्यप्रणालीद्वारे मुख्यमंत्री उद्धवजी ठाकरे यांच्या हस्ते तर ज्येष्ठ नेते खासदार शरदचंद्रजी पवार यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला.**



यावेळी राज्याचे उपमुख्यमंत्री अजित पवार हे दूरदृष्यप्रणालीद्वारे तर महसूल मंत्री बाळासाहेब थोरात, पालकमंत्री कु.आदिती तटकरे,आरोग्य मंत्री राजेश टोपे, वैद्यकीय शिक्षण मंत्री अमित देशमुख, जिल्हा परिषद अध्यक्षा श्रीमती योगिता पारधी, खासदार सुनिल तटकरे, आमदार बाळाराम पाटील, आमदार अनिकेत तटकरे, वैद्यकीय शिक्षण विभागाचे संचालक डॉ.दिलीप म्हैसेकर, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, पोलीस अधीक्षक अशोक दुधे, वैद्यकीय महाविद्यालयाचे अधिष्ठाता डॉ.महेंद्र कुरा, सहाय्यक अधिष्ठाता डॉ.गिरीष ठाकूर, सरपंच अनिता गोंधळी, जिल्हा परिषद उपाध्यक्ष सुधाकर घारे, माजी आमदार सुरेश लाड, सभापती बबन मनवे, महेंद्र घरत, पदाधिकारी, विविध विभागांचे शासकीय अधिकारी आदी मान्यवर प्रत्यक्ष उपस्थित होते.



## डॉ.सी.डी.देशमुख यांच्या नावाला साजेशी वास्तू साकारा
## विकासकामांसाठी निधीची कमतरता पडू देणार नाही
### -उपमुख्यमंत्री अजित पवार




रोह्याचे असलेले डॉ. चिंतामणराव देशमुख उर्फ सी. डी. देशमुख हे एक कर्तुत्ववान व्यक्तिमत्व होते. अशा या महान व्यक्तिमत्वाच्या नावाला साजेशी वास्तू उभी करावी, त्यासाठी निधीची कमतरता भासू देणार नाही, उपमुख्यमंत्री तथा अर्थमंत्री अजित दादा पवार






रोहा येथे डॉ. चिंतामणराव देशमुख शहर सभागृहाचा भूमीपूजन सोहळा उपमुख्यमंत्री अजित पवार यांच्या हस्ते संपन्न झाला. यावेळी पालकमंत्री कु. आदिती तटकरे, खासदार सुनील तटकरे, आमदार अनिकेत तटकरे, माजी आमदार सुरेश लाड, जिल्हा परिषद उपाध्यक्ष सुधाकर घारे, सभापती गीताताई जाधव, बबन मनवे, माजी नगराध्यक्ष संतोष पोटफोडे, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, पोलीस अधीक्षक अशोक दुधे, प्रांताधिकारी डॉ.यशवंत माने, तहसिलदार कविता जाधव, पदाधिकारी, नगरसेवक उपस्थित होते.

## जिल्ह्यातील प्रलंबित पाटबंधारे प्रकल्प वेगाने पूर्ण करावेत
### -जलसंपदा व लाभक्षेत्र मंत्री जयंत पाटील





जिल्हाधिकारी कार्यालयात आयोजित बैठकीत जिल्ह्यातील पाटबंधारे प्रकल्पांबाबतच्या सद्य:स्थितीचा आढावा जलसंपदा मंत्री जयंत पाटील यांनी घेतला. यावेळी पालकमंत्री कु.आदिती तटकरे, खासदार सुनील तटकरे, सर्वश्री आमदार रविंद्र पाटील, महेंद्र दळवी, महेंद्र थोरवे, अनिकेत तटकरे, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, पोलीस अधीक्षक अशोक दुधे, अपर जिल्हाधिकारी अमोल यादव, निवासी उपजिल्हाधिकारी डॉ.पद्मश्री बैनाडे, उपजिल्हाधिकारी (रोजगार हमी योजना) सुषमा सातपुते, पेण प्रांताधिकारी विठ्ठल इनामदार, अलिबाग प्रांताधिकारी प्रशांत ढगे, जलसंपदा विभाग कोकण प्रदेश मुख्य अभियंता विजय घोगरे, अधीक्षक अभियंता ठाणे पाटबंधारे मंडळ श्री.धाकतोडे, अधीक्षक अभियंता उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ श्री.जाधव, कार्यकारी अभियंता हेटवणे मध्यम प्रकल्प विभाग संजीव जाधव, कार्यकारी अभियंता रायगड पाटबंधारे विभाग क्र.०२ कोकण भवन श्रीमती राजभोज, तहसिलदार सचिन शेजाळ, विशाल दौंडकर व इतर अधिकारी उपस्थित होते.

# पसायदान जगाच्या पाठीवर तत्त्वज्ञान मांडणारे
## -महसूलमंत्री बाळासाहेब थोरात

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव




महाराष्ट्र वारकरी साहित्य परिषद यांच्या विद्यमाने १० वे अखिल भारतीय मराठी संत साहित्य संमेलनाचे उद्घाटन महसूलमंत्री बाळासाहेब थोरात यांच्या हस्ते खालापूर तालुक्यातील देवन्हावे येथील नोव्हाटेल इर्मेजिका या ठिकाणी संपन्न झाले. यावेळी वारकरी परिषदेचे अध्यक्ष विठ्ठल पाटील (काकाजी) दिनेश डिंगले, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, उपविभागीय अधिकारी अजित नैराळे, तहसिलदार आयुब तांबोळी, सुनील पाटील व वारकरी उपस्थित होते.

# जग जिंकायचं असेल तर मोठी स्वप्ने बघायला हवीत
## -पर्यटन मंत्री आदित्य ठाकरे





लोणेरे येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ परिसरातील इन्क्युबेशन सेंटर व पदव्युत्तर संशोधन केंद्र इमारतीचे भूमीपूजन तसेच अनुसूचित जाती जमातीच्या मुलींच्या वसतिगृहाचे भूमीपूजन पर्यटन, पर्यावरण, राजशिष्टाचार मंत्री आदित्य ठाकरे यांच्या हस्ते संपन्न झाले. यावेळी रायगड जिल्ह्याच्या पालकमंत्री कु.आदिती तटकरे, उच्च व तंत्रशिक्षण मंत्री श्री.उदय सामंत, परिवहन मंत्री ॲड.अनिल परब, खासदार श्री.सुनिल तटकरे, आमदार श्री.अनिकेत तटकरे, आमदार श्री.भरत गोगावले, आमदार महेंद्र दळवी, आमदार महेंद्र थोरवे, आमदार योगेश कदम, आमदार प्रकाश सुर्वे, किशोरभाई जैन, मुंबई इमारत सुधार व पुर्नरचना मंडळाचे अध्यक्ष श्री.विनोद घोसाळकर, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण संचालनालयाचे संचालक डॉ.अभय वाघ, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरेचे कुलगुरु प्रा.डॉ.कारभारी काळे, कुलसचिव प्रा.डॉ.भगवान जोगी व इतर मान्यवर उपस्थित होते.

# चवदार तळे सत्याग्रहाचा ९५ वा वर्धापन दिन




**चवदार तळे ऊर्जा स्रोत– गृहनिर्माण मंत्री जितेंद्र आव्हाड**

**भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा अधिकाधिक प्रसार करण्याचा प्रयत्न**

**– पालकमंत्री कु.आदिती तटकरे**





**गृहनिर्माण मंत्री जितेंद्र आव्हाड व पालकमंत्री कु. आदिती तटकरे यांनी चवदार तळे महाड येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पुतळ्यास पुष्पहार अर्पण करुन अभिवादन केले.**

## उच्च व तंत्रशिक्षण मंत्री उदय सामंत यांनी पेण येथील शासकीय तंत्रनिकेतन महाविद्यालयास दिली भेट, विविध विकासकामांचा घेतला आढावा





राज्याचे उच्च व तंत्रशिक्षण मंत्री उदय सामत यांनी शासकीय तंत्रनिकेतन पेण या संस्थेस भेट दिली. यावेळी उदय सामंत यांनी संस्थेस भेट दिल्यावर संस्थेच्या पूर्वीच्या व आताच्या परिस्थितीबाबत संस्थेचे प्राचार्य व तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिकाऱ्यांकडून माहिती घेतली.यावेळी तंत्रशिक्षण संचालनालयाचे संचालक डॉ.अभय वाघ, तंत्रशिक्षण मुंबई विभागीय कार्यालयाचे महासंचालक श्री.प्रमोद नाईक, महाराष्ट्र राज्य शिक्षण मंडळ, मुंबईचे संचालक डॉ.विनोद मोहितकर, कार्यकारी अभियंता श्री.सुखदेवे, पेण प्रांताधिकारी श्री.विठ्ठल इनामदार यांची उपस्थिती होती.

## शेतकऱ्यांची प्रतिष्ठा वाढण्याच्या, शेतकरी चिंतामुक्त होण्याच्या अन् शेतकऱ्यांच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीकोनातून कृषी विभाग कार्य करणार
### -कृषीमंत्री दादाजी भुसे








कृषी विभागाचे विविध उपक्रम व नियोजन दिशा याकरिता कृषी मंत्री श्री.दादाजी भुसे यांच्या अध्यक्षतेखाली नेरळ येथील सगुणा बाग येथे बैठक आयोजित करण्यात आली होती. यावेळी कर्जत-खालापूरचे आमदार महेंद्र थोरवे, कृषी विभागाचे प्रधान सचिव एकनाथ डवले आणि जिल्हा व तालुका कृषी अधिकारी हे उपस्थित होते.






कर्जत तालुक्यातील कोठिंबे येथे यशराज बायोटेक्नॉलॉजी लिमिटेडच्या पॉलिक्लोनल अँटीबॉडीज प्रकल्पाचे गृहमंत्री श्री.दिलीप वळसे-पाटील यांच्या हस्ते उद्घाटन संपन्न. यावेळी पालकमंत्री कु.आदिती तटकरे, IISC बंगलोरचे माजी संचालक पद्मभूषण प्रा. जी पद्मनाभन, आमदार महेंद्र थोरवे, आमदार पराग शहा, माजी आमदार सुरेश लाड, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, पोलीस अधीक्षक अशोक दुधे आदी मान्यवर उपस्थित





किल्ले रायगड येथे रायगड प्राधिकरण व केंद्रीय पुरातत्व विभागाच्या माध्यमातून किल्ले संवर्धन, उत्खनन व सुशोभिकरणाचे काम प्रगतिपथावर सुरू आहे. तसेच, पुर्णत्वास आलेल्या कामाची पाहणी पालकमंत्री कु. आदिती तटकरे यांनी केली. किल्ले संवर्धनातून आपला गौरवशाली इतिहास व महाराष्ट्राचे वैभव पुर्नजिवित होण्यास मदत होईल.




# जिल्हाधिकारी कार्यालयाच्या विस्तारीकरण कामाचा भूमीपूजन समारंभ पालकमंत्री कु.आदिती तटकरे यांच्या शुभहस्ते संपन्न





रायगड जिल्हाधिकारी कार्यालयाच्या विस्तारीकरण कामाचा भूमीपूजन समारंभ पालकमंत्री कु.आदिती तटकरे यांच्या शुभहस्ते जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आवारात संपन्न झाला. यावेळी जिल्हा परिषद अध्यक्षा श्रीमती योगिता पारधी, कोकण विभागीय आयुक्त श्री. विलास पाटील, जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ. किरण पाटील,पोलीस अधीक्षक अशोक दुधे, अपर जिल्हाधिकारी अमोल यादव, निवासी उपजिल्हाधिकारी डॉ.पद्मश्री बैनाडे, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयाचे अधिष्ठाता डॉ .महेंद्र कुरा, उपजिल्हाधिकारी (सा.प्र.) सर्जेराव म्हस्के–पाटील, उपजिल्हाधिकारी (रोहयो) सुषमा सातपुते, जिल्हा नियोजन अधिकारी श्री. मेहेत्रे, जिल्हा पुरवठा अधिकारी मधुकर बोडके, जिल्हा शल्य चिकित्सक डॉ. सुहास माने, कार्यकारी अभियंता जे.ए.सुखदेवे, तहसिलदार विशाल दौंडकर, सचिन शेजाळ, सतिश कदम, सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी गोविंद वाकडे, उपविभागीय अधिकारी प्रशांत ढगे, तहसिलदार मीनल दळवी आणि जिल्हाधिकारी कार्यालयातील इतर अधिकारी–कर्मचारी उपस्थित होते.

# डॉ.सलिम अली पक्षी अभ्यास व संशोधन केंद्राचे भूमीपूजन पालकमंत्री कु.आदिती तटकरे यांच्या हस्ते संपन्न

## या अभ्यास व संशोधन केंद्राच्या माध्यमातून स्थानिकांना रोजगार होणार उपलब्ध




किहीम येथील जुन्या जिल्हा परिषद शाळेत डॉ. सलीम अली पक्षी अभ्यास व संशोधन केंद्राचे भूमीपूजन पालकमंत्री कु.आदिती तटकरे यांच्या हस्ते संपन्न झाले. यावेळी जिल्हा परिषदेच्या अध्यक्षा कु.योगिता पारधी, ॲड. श्री.आस्वाद पाटील, कृषी व पशूसंवर्धन सभापती श्री.बबन मनवे, समाज कल्याण सभापती श्री.दिलीप भोईर, श्री.सुरेंद्र म्हात्रे, सौ.मानसी दळवी, बाजीराव परदेशी, मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, उप वनसंरक्षक श्री.आशिष ठाकरे, अप्पर पोलीस अधीक्षक अतुल झेंडे, बी.एन.एच.एस. चे संचालक श्री.बिवाश पांडव, शिक्षणाधिकारी ज्योत्स्ना शिंदे, अलिबाग पंचायत समिती सदस्य समिहा पाटील, किहीम ग्रामपंचायत सरपंच सीमा थळे, प्रमोद ठाकूर, अलिबाग वनपरिक्षेत्र अधिकारी विकास तरसे, पक्षी मित्र आदी मान्यवर उपस्थित होते.

# जिल्ह्यातील अधिकारी - कर्मचाऱ्यांनी घेतले भुवनेश्वर ओरिसा येथे चक्रीवादळ उपाययोजना प्रशिक्षण






जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली भुवनेश्वर (ओरीसा) येथे जिल्ह्यातील विविध विभागांच्या अधिकाऱ्यांचे पथक रवाना करण्यात आले होते. ओडिसा राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे महापूर व चक्रीवादळाच्या अनुषंगाने पूर्वतयारी व धोका सौम्यीकरणाच्या उपाययोजना केलेल्या आहेत. देशाच्या पश्चिम किनारपट्टीवर दरवर्षी येणाऱ्या चक्रीवादळामध्ये आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची पूर्वतयारी करण्यास ते अनुभवी आहेत. रायगड जिल्ह्यास मागील सलग दोन वर्षी निसर्ग व तोक्ते चक्रीवादळाचा तडाखा बसला असल्याने प्रशिक्षणाच्या माध्यमातून येणाऱ्या महापूर व चक्रीवादळास सामोरे जाण्यासाठी प्रशासन सज्ज राहील. त्यामुळे ओरीसा राज्याने महापूर व चक्रीवादळाच्या अनुषंगाने केलेल्या उपाययोजनांचा अभ्यास होण्यासाठी रायगड जिल्ह्यातील ५० प्रशिक्षणार्थींना महापूर व चक्रीवादळाबाबतचे प्रशिक्षण मधुसूदन दास विभागीय वित्त व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, चंद्रसेखरपूर, भुवनेश्वर, ओडिसा येथे दि.१५ ते १७ मार्च २०२२ या कालावधीमध्ये प्रशिक्षणासाठी पाठविण्यात आले होते.

# आपत्कालीन स्थितीत आवश्यक असणारे रेस्क्यू (विमोचन) साहित्य होमगार्ड संघटनेस जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या हस्ते सुपूर्द







**आपत्ती व्यवस्थापन साहित्य वाटप कार्यक्रमावेळी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, जिल्हा समादेशक तथा अपर जिल्हा पोलीस अधीक्षक श्री.अतुल झेंडे, उपजिल्हाधिकारी (निवडणूक) स्नेहा उबाळे, तहसिलदार (महसूल) सचिन शेजाळ, तहसिलदार विशाल दौंडकर, तहसिलदार अलिबाग श्रीमती मिनल दळवी, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी सागर पाठक व इतर अधिकारी उपस्थित होते.**

होमगार्ड संघटना ही मानसेवी संघटना ही मानसेवी स्वरुपाची असून पोलीस दलास सहाय्यकारी म्हणून कार्यरत आहे. आपत्कालीन स्थितीत स्थानिक प्रशासनाला मदत कार्यातही सहकार्य करते. त्या उद्देशाने मानसेवी होमगार्ड सदस्यांना प्रशिक्षण देण्यात येवून त्यांना मदत कार्यात सहभागी करून घेतले जाते. आपत्कालीन स्थितीत आवश्यक असणारे रेस्क्यू (विमोचन) साहित्य होमगार्ड कार्यालयाकडे उपलब्ध असल्यास त्याचा उपयोग होमगार्डना प्रशिक्षण देण्यासाठी करता येवू शकतो. त्यानुषंगाने जिल्हाधिकारी तथा जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे अध्यक्ष डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या संकल्पनेनुसार जिल्हा समादेशक, गृहरक्षक दल तथा अपर जिल्हा पोलीस अधीक्षक, रायगड यांना हायबीम सर्च लाईट – ४, एल.ई.डी फ्लड लाईट विथ बॅटरी ऑपरेटर – ४, ८mm रोप, १०mm रोप, १२mm रोप (प्रत्येकी १०० मीटर), वॉकी टॉकी हॅण्ड सेट – ४, फर्स्ट एड बॉक्स – ५, तंबू – ५, मेगा फोन – २, चेन सॉ/वूड कटर – २ हे साहित्य उपलब्ध करुन देण्यात आले.

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

# जिल्हा प्रशासन लागले मान्सून पूर्वतयारीला जिल्हाधिकाऱ्यांनी घेतला आपत्ती व्यवस्थापनाचा आढावा






मान्सून-२०२२ पूर्वतयारी आढावा बैठक व आपत्ती व्यवस्थापन कार्यशाळा जिल्हाधिकारी तथा जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे अध्यक्ष डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा नियोजन भवन येथे संपन्न झाली.

यावेळी मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.किरण पाटील, अपर जिल्हाधिकारी श्री.अमोल यादव, अपर पोलीस अधीक्षक अतुल झेंडे, निवासी उपजिल्हाधिकारी तथा जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ.पद्मश्री बैनाडे, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी सागर पाठक, विविध शासकीय कार्यालयांचे कार्यालयप्रमुख, यशदाचे आपत्ती व्यवस्थापन प्रशिक्षण केंद्राचे संचालक कर्नल सुपणेकर, कोस्ट गार्डच्या चांदनी चॅटर्जी, एनडीआरएफ चे डी.महेशकुमार, जीएसआय चे सैकत रॉय उपस्थित होते.

# खालापूर तालुक्यातील वावोशी मंडळात आपत्ती व्यवस्थापन प्रशिक्षण शिबिराचे आयोजन









# छत्रपती शिवाजी महाराज जयंतीनिमित्त जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर आणि अधिकाऱ्यांनी रायगडावर केले अभिवादन









यावेळी अप्पर जिल्हाधिकारी अमोल यादव, उपविभागीय अधिकारी महाड श्रीमती प्रतिमा पुदलवाड, कार्यकारी अभियंता रायगड विकास प्राधिकरण श्री. बामणे, श्री.भामरे, अलिबाग उपविभागीय अधिकारी प्रशांत ढगे, तहसिलदार सचिन शेजाळ, तहसिलदार सुरेश काशीद, पोलीस निरीक्षक श्री. देशमुख तसेच महाड प्रांत व तहसील कार्यालयाचे अधिकारी कर्मचारी उपस्थित होते.



पर्यावरण, वने आणि हवामान बदल मंत्रालय, नवी दिल्लीचे सहसचिव श्री. जीग्मेत टाकपा यांच्या अध्यक्षतेखाली सयुक्त समितीची बैठक जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या उपस्थितीत संपन्न.






रशिया-युक्रेन देशांत सुरू असलेल्या युद्धाच्या पार्श्वभूमीवर युक्रेनमध्ये अडकलेले रायगड जिल्ह्यातील विद्यार्थी घरी सुखरुप परतले. जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर तसेच जिल्हा प्रशासनातील अधिकाऱ्यांनी त्यांचे मनोधैर्य वाढविण्यासाठी या विद्यार्थ्यांची भेट घेऊन त्यांची विचारपूस केली.

# बेटी बचाओ, बेटी पढाओ अभियानांतर्गत शासनाने दिलेली उद्दिष्टे सर्वांनी मिळून पूर्ण करूया

**-एकात्मिक बालविकास सेवा योजना आयुक्त रुबल अग्रवाल**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव




स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त महिला व बालविकास विभागाच्या एकात्मिक बालविकास सेवा योजनेंतर्गत रायगड जिल्ह्यातील अंगणवाडी सेविका, आशा सेविका तसेच महिला व बालविकास विभागाच्या अधिकारी कर्मचाऱ्यांसाठी ङजिल्हास्तरीय पोषण अभियान व बेटी बचाओ..बेटी पढाओ कार्यशाळेचे आयोजन यावेळी रायगड जिल्हाधिकारी तथा पोषण अभियान अध्यक्ष डॉ.महेंद्र कल्याणकर, अलिबाग उपवनसंरक्षक आशिष ठाकरे, निवासी उपजिल्हाधिकारी डॉ.पद्मश्री बैनाडे, उपजिल्हाधिकारी (सा.प्र.) सर्जेराव म्हस्के-पाटील, जिल्हा नियोजन अधिकारी जयसिंग मेहेत्रे, जिल्हा कार्यक्रम अधिकारी नितीन मंडलिक, जिल्हा आरोग्य अधिकारी डॉ.सुधाकर मोरे, जिल्हा महिला व बालविकास अधिकारी विनित म्हात्रे, जिल्हा बाल संरक्षण अधिकारी अशोक पाटील, उपमुख्य कार्यकारी अधिकारी तथा ग्रामीण विकास आरोग्य यंत्रणेच्या प्रकल्प संचालक डॉ.ज्ञानदा फणसे, शिक्षणाधिकारी ज्योती शिंदे-पवार, स्वदेश फाऊंडेशनचे जिल्हा व्यवस्थापक तुषार इनामदार, बालविकास प्रकल्प अधिकारी चेतन गायकवाड, अंगणवाडी पर्यवेक्षिका, अंगणवाडी सेविका, आशा वर्कर्स आदी उपस्थित होते.




**या कार्यक्रमाच्या निमित्ताने गरोदर स्त्रिया, स्तनदा माता, बालके व किशोरवयीन मुली यांच्या आरोग्याची नियमित पणे घ्यावयाची काळजी व उपयोग योजना तसेच महिला व मुलींकरिता शासकीय योजनांबद्दलच्या घडीपत्रिकेचे प्रकाशन करताना मान्यवर**

# जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासन यशस्वी

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव


बालविवाहासारख्या अनिष्ट प्रथांना बळी न पडण्याचे जिल्हाधिकाऱ्यांचे आवाहन!

जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे मुरुड तालुक्यातील मौजे भोईघर येथील टेंभोंडे आदिवासीवाडी येथे होणारा बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासनाला यश मिळाले. याकरिता अलिबाग उपविभागीय अधिकारी श्री.प्रशांत ढगे व मुरुड तहसिलदार श्री.रोहन शिंदे,निवासी नायब तहसिलदार श्री.रविंद्र सानप, भोईघर तलाठी अमृत चोगले यांना घटनास्थळी तात्काळ पाठविले. भोईघर गावचे सरपंच श्री.काशिनाथ वाघमारे, रेवदंडा पोलीस ठाण्याचे पोलीस निरीक्षक श्री.अशोक थोरात, मंडळ अधिकारी श्री.लक्ष्मण शेळके, साळाव तलाठी श्रीमती भावना धोदडे, निडी पोलीस पाटील श्री.नितेश पाटील, साळाव पोलीस पाटील श्री.मेहबूब हुसैन गोरमे व साळाव ग्रामपंचायत सदस्य राजू वाघमारे, साळाव सरपंच निलम पाटील, ग्रामस्थ श्री.नरेश वाघमारे या सर्वांनी मिळून तातडीने कार्यवाही केली.

या घटनेच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी डॉ.कल्याणकर यांनी जनतेला तसेच कातकरी बांधवांना आवाहन केले आहे की, बालविवाहासारख्या अनिष्ट प्रथांना बळी पडू नका. जिल्ह्यातील कातकरी आदिवासी बांधवांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी, त्यांना सर्व प्रकारचे शासकीय लाभ, दाखले मिळवून देण्यासाठी, आरोग्य सोयी सुविधा मिळवून देण्यासाठी, त्यांचे स्थलांतर रोखण्यासाठी, त्यांचा सामाजिक व आर्थिक स्तर उंचाविण्यासाठी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या पुढाकारातून कातकरी उत्थान अभियान व सप्तसूत्री कार्यक्रम सर्व स्तरांवरून राबविण्यात येत आहे.

## जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासन यशस्वी

### बालविवाहासारख्या अनिष्ट प्रथांना बळी न पडण्याचे जिल्हाधिकाऱ्यांचे आवाहन!

## जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासन यशस्वी

**अलिबाग, दि.२४ (जिमाका):- जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे मुरुड तालुक्यातील मौजे भोईघर येथील टेंभोंडे आदिवासीवाडी येथे होणारा बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासनाला यश मिळाले. या घटनेच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी डॉ.कल्याणकर यांनी जनतेला आवाहन केले आहे की, बालविवाहासारख्या अनिष्ट प्रथांना बळी पडू नका. जिल्ह्यातील कातकरी आदिवासी बांधवांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी, त्यांना सर्व प्रकारचे शासकीय लाभ, दाखले मिळवून देण्यासाठी, आरोग्य सोयी सुविधा मिळवून देण्यासाठी, त्यांचे स्थलांतर रोखण्यासाठी, त्यांचा सामाजिक व आर्थिक स्तर उंचाविण्यासाठी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या पुढाकारातून कातकरी उत्थान अभियान व सप्तसूत्री कार्यक्रम सर्व स्तरांवरून राबविण्यात येत आहे.**

### जिल्हाधिकाऱ्यांच्या तत्परतेने

## आदिवासींचा बालविवाह रोखला

। अलिबाग । विशेष प्रतिनिधी ।

जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या तातडीच्या निर्णयामुळे मुरुड तालुक्यातील मौजे भोईघर येथील टेंभोंडे आदिवासीवाडी येथे होणारा बालविवाह रोखण्यात जिल्हा प्रशासनाला यश मिळाले.

जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांना सोमवारी (२१ फेब्रुवारी) सकाळी ८ वाजताच मौजे भोईघर येथील टेंभोंडे आदिवासीवाडी येथे बालविवाह होत असल्याची माहिती मिळाली. घटनेचे गांभीर्य लक्षात घेऊन जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी तातडीने मौजे भोईघर येथील टेंभोंडे आदिवासीवाडी येथे जाण्याबाबत व संबंधितांचे प्रबोधन करून हा बालविवाह रोखण्याच्या दृष्टीने यंत्रणेला आवश्यक ते निर्देश दिले.

त्याप्रमाणे उपविभागीय अधिकारी अलिबाग प्रशांत ढगे व मुरुड तहसीलदार रोहन शिंदे यांनी तात्काळ मुरुड

**मुरुड तालुक्यातील घटना** प्रशासनाकडून कुटुंबांचे प्रबोधन

"बालविवाहासारख्या अनिष्ट प्रथांना बळी पडू नका. जिल्ह्यातील कातकरी आदिवासी बांधवांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी, त्यांना सर्व प्रकारचे शासकीय लाभ, दाखले मिळवून देण्यासाठी, आरोग्य सोयी सुविधा मिळवून देण्यासाठी, त्यांचे स्थलांतर रोखण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे.
– डॉ.महेंद्र कल्याणकर, जिल्हाधिकारी

पान २ वर

# अवैध रेती उत्खनन व्यावसायिकांनावर महसूल विभागाची धडक कारवाई





अवैध रेती उत्खनन व्यावसायिकांना जिल्हा प्रशासनाचा इशारा जिल्हाधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली
**महसूल विभागाची यशस्वी कारवाई**

## महसूल विभागाची धडक कारवाई अवैध रेती उत्खनन व्यवसायिकांना इशारा

**रोहा, तळा तालुका हद्दीतील खाडीपट्ट्यात जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली महसूल विभागाची यशस्वी कारवाई**

अलिबाग दि.२३ (प्रतिनिधी)- रोहा, तळा तालुका हद्दीतील कांडणे खुर्द ठिकाणी अलीकडच्या काळात बाहेरील व्यक्तींकडून अवैध रेती उत्खनन व वाहतूक सुरू होती. स्थानिकांना रोजगार नाही, बाहेरचे रेती व्यावसायिक अवैध रेती उत्खनन करीत असल्याने सक्शन पंपावर जप्तीची कारवाई करावी, अशा तक्रारी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर तसेच रोहा प्रांताधिकारी डॉ.यशवंतराव माने यांच्याकडे प्राप्त झाल्या. यापूर्वी कुंडलिकेच्या खाडीपट्ट्यात महसूल विभागाने अवैध रेती उपसा करणाऱ्यांविरुद्ध धडक कारवाई केली होती.

आताही प्राप्त तक्रारींची तातडीने दखल घेवून, मंगळवार, दि.२२ फेब्रुवारी २०२२ रोजी सायंकाळी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली, प्रांताधिकारी डॉ.यशवंत माने यांच्या आदेशान्वये तहसिलदार कविता जाधव व त्यांच्या पथकाने सर्वात मोठी कारवाई केली. या पथकाने केलेल्या कारवाईत ४ सक्शन पंप, ७ होड्या जाळून नष्ट करण्यात आल्या. महसूल पथकाने कांडणे खुर्द, खाजणी खाडीपट्ट्यातील रेती उत्खनन यंत्रणेवर धडक कारवाई केल्याने बेकायदेशीर रेती उत्खनन करणाऱ्या व्यावसायिकांना अवैध गोष्टी थांबविण्याचा थेट इशाराच मिळाला आहे.

तळा मुख्यतः रोहा कुंडलिका, (पान ४ वर)

आपलं महानगर | My महानगर.com

शब्दांना सत्याची धार
RANE PRAKASHAN PRIVATE LIMITED
प्रहार

## अवैध रेती उपसा करणाऱ्यांविरुद्ध महसूल विभागाची धडक कारवाई

**४ सक्शन पंप, ७ होड्या जाळून केल्या नष्ट**

**अलिबाग (प्रतिनिधी) :**

रोहा, तळा तालुका हद्दीतील कांडणे खुर्द ठिकाणी अलीकडच्या काळात बाहेरील व्यक्तींकडून अवैध रेती उत्खनन व वाहतूक सुरू होती. स्थानिकांना रोजगार नाही, बाहेरचे रेती व्यावसायिक अवैध रेती उत्खनन करीत असल्याने सक्शन पंपावर जप्तीची कारवाई करावी, अशा तक्रारी जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर तसेच रोहा प्रांताधिकारी डॉ. यशवंतराव माने यांच्याकडे प्राप्त झाल्या. यापूर्वी कुंडलिकेच्या खाडीपट्ट्यात महसूल विभागाने अवैध रेती उपसा करणाऱ्यांविरुद्ध धडक कारवाई केली होती.

प्राप्त तक्रारींची तातडीने दखल घेऊन मंगळवार, दि. २२ फेब्रुवारी २०२२ रोजी सायंकाळी जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली प्रांताधिकारी डॉ. यशवंत माने यांच्या आदेशान्वये तहसीलदार कविता जाधव व त्यांच्या पथकाने सर्वात मोठी कारवाई केली. या पथकाने केलेल्या कारवाईत ४ सक्शन पंप, ७ होड्या जाळून नष्ट करण्यात आल्या. महसूल पथकाने कांडणे खुर्द, खाजणी खाडीपट्ट्यातील रेती उत्खनन यंत्रणेवर धडक कारवाई केल्याने बेकायदेशीर रेती उत्खनन करणाऱ्या व्यावसायिकांना अवैध गोष्टी थांबवण्याचा थेट इशाराच मिळाला आहे.

तळा मुख्यतः रोहा कुंडलिका, भालगाव खाडीपट्ट्यात गेल्या काही दिवसांपासून अवैध रेती उत्खनन व रात्री उशिरा अवैध रेती वाहतूक सुरू होती. विभागातील स्थानिकांना रोजगार नाही. त्यातच बाहेरच्या व्यावसायिकांनी रेती उपसा सत्र सुरूच ठेवले होते. मात्र मंगळवारी सायंकाळी तहसीलदार कविता जाधव यांच्या मार्गदर्शनाखाली मंडळ अधिकारी भरत गुंड, तलाठी राऊत, विशाल चोरगे यांनी खाजणी घटनास्थळी पाहणी केली अन् धडक कारवाईला सुरुवात केली.

या कारवाईत त्यांना खाडीकिनारी ४ सक्शन पंप, ७ होड्या आढळून आल्या. ४ होड्यांमध्ये रेती होती. या पथकाने तातडीने पंचनामा करून ४ सक्शन पंप, ७ होड्या जाळून निकामी करून टाकल्या. कांडणे खुर्द, खाजणी खाडीपट्ट्यातील अवैध रेती उत्खननावर महसूल विभागाने प्रथमच ऐतिहासिक धडक कारवाई केली. होड्या, सक्शन पंप जाळण्याची कारवाई केल्याने संबंधितांचे लाखो रुपयांचे नुकसान झाले आहे, अशा प्रकारे कोणत्याही प्रकारचे अवैध व्यवसाय सुरू ठेवता येणार नाहीत, असा सज्जड इशारा प्रांताधिकारी डॉ. यशवंतराव माने यांनी अवैध धंदे करणाऱ्यांना दिला आहे.

## रायगड जिल्ह्यात १९२ अवैध उत्खननावर कारवाई

**मार्च अखेरपर्यंत १ कोटी ५३ लाखांचा दंड वसूल**

वार्ताहर : अलिबाग

रायगड जिल्ह्यात आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये १९२ अवैध उत्खननावर कारवाई करण्यात आली आहे. जिल्हास्तरीय धाड पथकाने केलेल्या या कारवाईतून १ कोटी ५३ लाख ९ हजार २२० रुपये दंड वसूल केला आहे.

रायगड जिल्ह्यातील गौण खनिज महसूल वसुलीचे उद्दिष्ट आर्थिक वर्ष २०२१-२२ साठी २०२ कोटी ७० लाख रुपये होते. मात्र, मार्च २०२२ अखेरपर्यंत १६०कोटी ७० लाख रुपये महसूल वसुली करण्यात गौण खनिज विभागाला यश आले आहे. गौण खनिज स्वामित्वधन शुल्क (रॉयल्टी) आणि अवैध उत्खनन व अवैध वाहतुकीपोटी दंडात्मक कारवाईतून ही रक्कम वसूल करण्यात आली आहे.

रायगड जिल्ह्यातील वाळू, गिट्टी, मुरूम व माती इत्यादी गौण खनिजाचे स्वामित्वधन शुल्क आणि गौण खनिजाचे अवैध उत्खनन व अवैध वाहतुकीसंदर्भात दंडात्मक कारवाईतून २०२१-२२ या वर्षात २०२ कोटी ७० लाख रुपयांचे उद्दिष्ट जिल्हा खनिकर्म विभागाला देण्यात आले आहे.या तुलनेत मार्च २०२२ अखेरपर्यंत १६०कोटी ७० लाख रुपये (७९.४४ टक्के) गौण खनिज महसूल वसुली करण्यात आली आहे. त्यामध्ये गौण खनिजाच्या स्वामित्वधन शुल्क (रॉयल्टी) आणि गौण खनिजाचे अवैध उत्खनन व अवैध वाहतुकीपोटी दंडात्मक कारवाईतून वसूल करण्यात आलेल्या रकमेचा समावेश आहे. गौण खनिजाची महसूल वसुली ७९.४४ टक्के राहिल्याने जिल्हा खनिकर्म विभागाचे महसूल वसुलीचे उद्दिष्ट अपूर्ण राहिले आहे.

गौण खनिजाच्या अवैध वाहतुकीसंदर्भात कारवाई करण्यासाठी रायगड जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या आदेशानुसार जिल्हा खनिकर्म अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय आकस्मिक धाड पथक स्थापन करण्यात आले होते. या पथकामार्फत गत वर्षात गौण खनिजाच्या अवैध १९२ अवैध उत्खननावर दंडात्मक कारवाई करण्यात आली.

> गौण खनिज महसूल वसुली उद्दिष्टाच्या तुलनेत नोव्हेंबर अखेरपर्यंत ७९.४४ टक्के महसूल वसुली करण्यात आली असून, जिल्हास्तरीय आकस्मिक धाड पथकाने गौण खनिज अवैध वाहतूक संदर्भात केलेल्या दंडात्मक कारवाईतून एक कोटी रुपयांचा महसूल वसूल करण्यात आला आहे.दीड वर्ष कोरोनाच्या महामारीत गेले. मात्र तरीही जिल्ह्याला मोठे उद्दिष्ट शासनाकडून मिळालेले आहे. हे उद्दिष्ट पूर्ण करण्याचे प्रयत्न आहेत.
>
> **-आर. आर. मेश्राम,**
> जिल्हा खनिकर्म अधिकारी, रायगड




# राष्ट्रीय मतदार दिवस

## सर्व मतदार बनू.. सशक्त, सुरक्षित आणि जागरुक

## जिल्ह्यात विविध कार्यक्रमांनी राष्ट्रीय मतदार दिवस झाला उत्साहात साजरा

**– जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर**




राष्ट्रीय मतदार दिवसाच्या पार्श्वभूमीवर हा जिल्हास्तरीय कार्यक्रम जिल्हा निवडणूक अधिकारी, रायगड व जे.एस.एम महाविद्यालय अलिबाग, निवडणूक साक्षरता क्लब यांच्या संयुक्त विद्यमाने मंगळवार, दि.२५ जानेवारी रोजी पी.एन.पी. नाट्यगृह, अलिबाग येथे जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर, सुप्रसिद्ध मराठी अभिनेत्री प्रार्थना बेहेरे, जे.एस.एम महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ.अनिल पाटील यांच्या प्रमुख उपस्थितीत कोविड-१९ नियमांचे पालन करीत संपन्न झाला.

यावेळी अपर जिल्हाधिकारी श्री.अमोल यादव, उप जिल्हाधिकारी (सामान्य प्रशासन) सर्जेराव म्हस्के पाटील, उपजिल्हा निवडणूक अधिकारी श्रीमती स्नेहा उबाळे, निवासी उपजिल्हाधिकारी डॉ.पद्मश्री बैनाडे, उपजिल्हाधिकारी सुषमा सातपुते, मतदार नोंदणी अधिकारी तथा उपविभागीय अधिकारी श्री.प्रशांत ढगे व सहाय्यक मतदार नोंदणी अधिकारी तथा तहसिलदार श्रीमती मीनल दळवी, जिल्हा दिव्यांग आयकॉन श्री.साईनाथ पवार, प्रिझम सामाजिक विकास संस्थेच्या अध्यक्षा तथा जिल्हा युथ आयकॉन तपस्वी गोंधळी आदी मान्यवर उपस्थित होते.










# जागतिक महिला दिनानिमित्त अलिबाग येथे स्त्रिया आणि लोकशाही - लोकशाही गप्पा (भाग ५) या परिसंवादाचे आयोजन




## पुरुषप्रधान समाजामध्ये महिलांच्या समस्यांवर उत्तर शोधण्याचे काम पुरुषांचे सुद्धा

-मुख्य निवडणूक अधिकारी श्रीकांत देशपांडे




या परिसंवादामध्ये सामाजिक कार्यकर्त्या सुरेखा दळवी, वैशाली पाटील, मुमताज शेख, प्रयोगशील शिक्षक सुजाता पाटील, प्राध्यापक डॉ.श्याम पाखरे, पत्रकार जयंत धुळप, सामाजिक कार्यकर्ते शशिकांत सोनवणे हे सहभागी होणार असून संवादक म्हणून मुंबई विद्यापीठाचे प्राध्यापक डॉ.दीपक पवार यांनी सहभाग घेतला.








# मतदार जागृती अभियान









मतदार जागृती अभियानांतर्गत मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य श्रीकांत देशपांडे आणि जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या प्रमुख उपस्थितीत सु.ए.सो. माध्यमिक विद्यालय, कुरुळ, अलिबाग येथे ''मतदान जागृती – महाविद्यालयांचा सहभाग'' कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते.

यावेळी उपजिल्हा निवडणूक अधिकारी स्नेहा उबाळे, अलिबाग प्रांताधिकारी प्रशांत ढगे, जे.एस.एम. महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ.अनिल पाटील, कुरूळ सरपंच ॲड.जनार्दन पाटील, ॲड.प्रसाद पाटील, मुख्याध्यापिका सुजाता पाटील, विद्यालयातील विद्यार्थी–विद्यार्थिनी आदी उपस्थित होते.





मतदार जागृती अभियानांतर्गत मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य श्रीकांत देशपांडे आणि जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या प्रमुख उपस्थितीत जे.एस.एम.कॉलेज अलिबाग येथे विशेष कार्यक्रमाचे आयोजन यावेळी उप जिल्हाधिकारी व उपजिल्हा निवडणूक अधिकारी स्नेहा उबाळे, अलिबाग तहसिलदार मिनल दळवी, महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ.अनिल पाटील, जनता शिक्षण मंडळाचे अध्यक्ष ॲड.गौतम पाटील आदी मान्यवर उपस्थित या कार्यक्रमात निवडणूक साक्षरता मंडळ, चुनाव पाठशाळा, मतदार जागृती मंच, मतदार मार्गदर्शिका, मार्गदर्शक पुस्तके व माहितीपत्रके आणि मतदार जागृती खेळांचे महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना वाटप करण्यात आले

# पोषण अभियानात राज्यात रायगड जिल्हा अग्रेसर

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव




पोषण अभियान जन आंदोलन कार्यक्रम अभियानात सर्वोत्कृष्ट लोकसहभाग घेतलेल्या जिल्ह्यांमध्ये रायगड जिल्ह्याने जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली राज्यस्तरावर प्रथम क्रमांक प्राप्त केला आहे. उपमुख्यमंत्री अजित पवार, महसूल मंत्री बाळासाहेब थोरात, महिला व बालविकास मंत्री ॲड.यशोमती ठाकूर यांच्या हस्ते पुरस्कार स्वीकारताना जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर. सोबत रायगड जिल्हा परिषद महिला व बालकल्याण सभापती गीताताई जाधव, मुख्य कार्यकारी अधिकारी डॉ. किरण पाटील व जिल्हा कार्यक्रम अधिकारी नितीन मंडलिक.

## मराठी भाषा संवर्धन पंधरवडा



लाभले आम्हास भाग्य, बोलतो मराठी, जाहलो खरेच धन्य, ऐकतो मराठी..मराठी भाषा संवर्धन पंधरवडा निमित्ताने जिल्हाधिकारी कार्यालयातील राजस्व सभागृहात या उपक्रमाचा दिमाखदार उद्घाटन कार्यक्रम उत्साहात संपन्न झाला. यावेळी उपजिल्हाधिकारी सर्जेराव म्हस्के-पाटील, स्नेहा उबाळे, जिल्हा पुरवठा अधिकारी मधुकर बोडके, जिल्हा माहिती अधिकारी मनोज सानप, तहसिलदार विशाल दौंडकर, पत्रकार नागेश कुलकर्णी व जिल्हाधिकारी कार्यालयातील कर्मचारी उपस्थित होते.






स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

## गेल्या दोन वर्षात शासनाने राबविलेल्या जनकल्याणकारी योजनांचा कलापथकांच्या माध्यमातून रायगड जिल्ह्यात अनोखा जागर



रायगड जिल्ह्यात लोककलापथकांच्या माध्यमातून शासकीय योजनांचा लोकजागर करण्यात आला. यावेळी राज्यमंत्री तथा पालकमंत्री कु. आदिती तटकरे यांनी प्रिझम सामाजिक विकास संस्थेच्या कलाकारांना शुभेच्छा दिल्या.



अलिबाग, मुरुड-जंजिरा विधानसभा मतदारसंघाचे मा. आमदार श्री. महेंद्र दळवी यांनी लोककलापथक कार्यक्रमास भेट देवून शुभेच्छा दिल्या.












# “परिवर्तन” पुस्तिकेच्या पहिल्या अंकाचे अवलोकन करताना मान्यवर






मा. खासदार शरदचंद्रजी पवार



मा. राज्यपाल भगतसिंहजी कोश्यारी



मा. महसूलमंत्री बाळासाहेबजी थोरात व
मा. आरोग्यमंत्री राजेशजी टोपे



मा. उच्च व तंत्र शिक्षणमंत्री उदयजी सामंत



श्री सिद्धीविनायक मंदीर न्यासाचे
अध्यक्ष मा. श्री. आदेशजी बांदेकर



मुख्य सचिव मा. श्री. मनुकुमारजी श्रीवास्तव

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

पुढारी

# महसूल उद्दिष्ट पूर्तीत रायगड कोकणात अव्वल

## जमीन महसूल १३८ कोटी ५ लाख तर गौण खनिज वसुली १६० कोटी ६१ लाख

रायगड : सुयोग आंग्रे

महसुली वर्ष २०२१- २०२२ मध्ये रायगड जिल्ह्यासाठी शासनाने ३२७ कोटी ८८ लाख ३ हजार रुपयांचे महसूल उद्दिष्ट गाठण्याचे लक्ष्य दिले होते. कोरोनाचे सावट, रेती लिलावांना समाधानकारक प्रतिसाद नाही असे असताना देखील रायगड जिल्हा प्रशासनाने ९१.२१ टक्के महसूल उद्दिष्ट गाठण्यात यश मिळविले आहे. रायगड जिल्ह्याला देण्यात आलेल्या महसूल उद्दिष्टांपैकी२९९ कोटी ५ लाख ६७ हजार रुपयांची वसुली महसूल विभागाने केली आहे. या कामगिरीमुळे रायगड जिल्हा कोकण विभागात महसूल उद्दिष्ट गाठण्यात अव्वल स्थानावर पोहचला आहे.





संग्रहीत छायाचित्र

रायगड जिल्ह्याला शासनाने महसूल उद्दिष्ट गाठण्याचे लक्ष्य दिले होते. हे उद्दिष्ट गाठण्यासाठी जमीन महसूल, गौणखनिज उत्खनन, करमणूक कर आणि इतर लेखाशिर्ष या माध्यमातून जिल्हा प्रशासनामार्फत वर्षभर वसुली कार्यक्रम सुरु होता. करमणूक कर आणि इतर लेखाशिर्ष अंतर्गत वसुलीवर निर्बंध असल्याने केवळ जमीन महसूल आणि गौणखनिज या दोन लेखाशिर्षांवर महसूल वसुलीची जबाबदारी येऊन ठेपली होती. महसूल उद्दिष्ट पूर्ती करण्यासाठी जिल्हा प्रशासनाने जमीन महसूलसाठी १२५ कोटी ६० लाख ३ हजार रुपयांचे उद्दिष्ट दिले होते. महसूल विभागाने १३८ कोटी ५ लाख ३० हजार रुपयांचे उद्दिष्ट गाठले आहे. महसूल विभागाने १०९.९१ टक्के वसुली करून आपली कामगिरी चोख बजावली आहे.

गौणखनिजसाठी २०२ कोटी २८ लाख रुपयांचे उद्दिष्ट देण्यात आले होते. त्यापैकी १६० कोटी ६१ लाख ८८ हजार रुपयांचे उद्दिष्ट गौणखनिज विभागाने गाठले आहे. रायगड जिल्ह्यात रेती उत्खनन बंदी आणि रेती लिलावांना प्रतिसाद मिळाला नसल्याने गौणखनिज विभागाला ७९.४० टक्के उद्दिष्ट गाठता आले. करमणूक करमधून ३८ लाख ४९ हजार रुपयांचा कर वसूल करण्यात आला आहे.

रायगड जिल्ह्यात असणाऱ्या १५ तालुक्यांमध्ये महसूल प्रशासनने आठ विभाग केले आहेत. यामध्ये रोहा, महाड, माणगाव, श्रीवर्धन, अलिबाग, कर्जत, पनवेल आणि पेण या उपविभागांचा समावेश आहे. रोहा उपविभागासाठी २४ कोटी ३६ लाख, महाड २५ कोटी ८० लाख, माणगाव २५ कोटी ३५ लाख, श्रीवर्धन ६ कोटी ७५ लाख, अलिबाग २६ कोटी ७१ लाख, कर्जत ५१ कोटी ६६ लाख, पनवेल ८४ कोटी ९९ लाख आणि पेण उपविभागासाठी २१ कोटी १३ लाख रुपयांचे महसूल उद्दिष्ट देण्यात आले होते. देण्यात आलेल्या उद्दिष्टांपैकी रोहा उपविभागाने ८ कोटी ७५ लाख, महाड १० कोटी ४५ लाख ७१ हजार, माणगाव १४ कोटी ८३ लाख ९० हजार, श्रीवर्धन ४ कोटी २३ लाख २९ हजार, अलिबाग १७ कोटी ६३ लाख ५९ हजार, कर्जत ४१ कोटी ५९ लाख ५४ हजार, पनवेल ७७ कोटी ५ लाख ८ हजार आणि पेण उपविभागाने २४ कोटी ७८ लाख १८ हजार रुपयांचे महसूल उद्दिष्ट गाठले.

रायगड जिल्ह्याने गाठलेल्या महसूल उद्दिष्टांमध्येजिल्हाधिकारी ... महसूल विभाग अव्वल स्... कार्यालयातीलमहसूल वि... गाठले आहे. जिल्हाधिक... विभागाला ७५ कोटी ... आले होते. जिल्हाधिका... विभागाने ९९ कोटी ३२ ...

> कोकण विभागात रायगड जिल्हा महसूल उद्दिष्ट गाठण्यात अव्वल ठरला आहे. रायगड जिल्ह्याच्या महसूल विभागाने जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली महसूल उद्दिष्ट करण्यासाठीची मोहीम यशस्वी केली आहे. जमीन महसूल लेखाशीर्षामधून१३८ कोटी ५ लाख ३० हजार आणि गौणखनिज उत्खनन लेखाशीर्ष मधून १६० कोटी ६१ लाख ८८ हजार रुपयांची वसुली करण्यात आली आहे.
>
> सचिन ...

# पनवेल तालुक्यातील बेकायदेशीर बारचे परवाने रद्द

## अनेक नियमांचा भंग केल्याप्रकरणी जिल्हाधिकाऱ्यांची धडक कारवाई

**पनवेल, दि.२९ (साहिल रेळेकर) : विविध नियमांचा भंग केल्याप्रकरणी पनवेल तालुक्यातील कोन गावाच्या हद्दीतील साईदर्शन व साईराज बारवर रायगडचे जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांनी धडक कारवाई करून या दोन्हीही बारचे परवाने कायमस्वरूपी रद्द करण्यात आले आहेत. बार मधील महिला वेटर्स व गिऱ्हाईके यांच्यात अश्लील हातवारे, बीभत्स वर्तन होत असल्याबाबत यापूर्वी पनवेल पोलिसांकडे अनेक गुन्हे दाखल करण्यात आले होते. तरीदेखील वारंवार नियमांचा भंग करून बार चालवण्यात येत असल्याचे निष्पन्न झाल्याने अखेर रायगडचे जिल्हाधिकारी डॉक्टर महेंद्र कल्याणकर यांनी धडक कारवाई करून या दोन्ही बारचे परवाने कायमस्वरूपी रद्द करण्यात आले आहेत.**



पनवेल तालुक्यातील कोन गावाच्या हद्दीतील हॉटेल साईदर्शन बार येथे राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या पनवेल येथील दुय्यम निरिक्षकांच्या पथकाने २१ फेब्रुवारी २०२२ रोजी अचानक भेट देऊन परवान्याच्या अनुषंगाने पाहाणी केली. त्याचप्रमाणे याच परिसरातील हॉटेल साईराज बार येथे देखील पनवेल दुय्यम निरिक्षकांच्या पथकाने १६ फेब्रुवारी २०२२ रोजी अचानक भेट देऊन परवान्याच्या अनुषंगाने पाहाणी केली असता त्याठिकाणी अनेक अनियमितता ... त्याचबरोबर बार मध्ये काम करणाऱ्या कामगार नोंदीच्या अपूर्ण वह्या व पाच महिला विना नोकरनामा येथे काम करताना पथकाला चौकशीदरम्यान आढळून आल्या. बारकरिता मंजूर जागेपेक्षा अधिक जागा वापरण्यात येत असल्याचेही चौकशीदरम्यान निदर्शनास आले होते. तसेच महिला वेटर आणि गिऱ्हाईके यांच्यात असभ्य वर्तन होत असल्याचे वारंवार निदर्शनास आल्याने व अनेकदा वेळेच्या नियमांचा भंग केल्याचेही निदर्शनास आल्याने यापूर्वीही बार वर अनेक ... आयुक्तालया अंतर्गत परिमंडळ-२ पोलिसांनी दाखल केलेले आहेत.

या सर्व पार्श्वभूमीवर या दोन्हीही बारकडून विविध प्रकारच्या नियमांचा भंग झाल्याप्रकरणी जिल्हाधिकाऱ्यांसमोर दोन्हीही बारबाबत सोमवारी (दि.२८ मार्च) सुनावणी पार पडली. अखेर या दोन्हीही बारच्या अनेक नियमभंगतेबाबत जिल्हाधिकाऱ्यांनी धडक कारवाईचा बडगा उगारून हॉटेल साईदर्शन व साईराज या दोन्हीही बारचे परवाने ... केलेल्या या धडक कारवाईमुळे पनवेल तालुक्यातील अवैध बार चालकांचे मात्र चांगलेच धाबे दणाणले आहेत.

पनवेल तालुका परिसरात युवापिढीला बरबाद करणारे लेडीज डान्स बार मोठ्या प्रमाणात आहेत. पोलीसांच्या डोळ्यात धुळफेक करुन ऑर्केस्ट्राच्या नावाखाली हे लेडीज डान्सबार चालविले जातात. ऑर्केस्ट्रा फक्त नावाला; बाकी सर्व अश्लिल... बीभत्स हावभाव करून नाचणे, ग्राहकांना आकर्षित करण्यासाठी त्यांच्याशी अश्लील चाळे करणे अशा प्रकारचे गैरकृत्य करणाऱ्या बारचालकांना कायमचा चाप लावण्याची मागणी स्थानिक राहिवाश्यांकडून केली जात आहे.

अशाप्रकारे नियमांचे उल्लंघन करणाऱ्यांवर जिल्हाधिकाऱ्यांच्या मार्गदर्शनाखाली यापुढे ...

# मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना जिल्ह्यात यशस्वी

...३१ नवउद्योजकांना २ ...ी ३० लाख ४६ हजार ...दान मंजूर

...५६ प्रकरणांची जिल्हा ...बल समितीद्वारे विविध ...कडे शिफारस

### उत्पादन आणि सेवा उद्योगांना सरकारी अनुदान

**मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेमध्ये उत्पादन व सेवा उद्योगांकरीता बँकमार्फत कर्ज पुरवठा केला जातो. उत्पादन उद्योगांकरीता ५० लाख व सेवा उद्योगांकरीता १० लाखांपर्यंत अर्थसहाय्य केले जाते. यामध्ये शासनामार्फत ग्रामीण भागातील लाभार्थ्यांना २५ ते ३५ टक्के व शहरी भागातील लाभार्थ्यांकरीता १५ ते २५ टक्के अनुदान दिले जाते.**

...: पुढारी वृत्तसेवा

...मंत्री रोजगार निर्मिती ...र्गत सन २०२१-२२ या ...र्षात रायगड जिल्ह्यातील १३१ ...कांच्या एकुण २ कोटी ३० ... हजार रुपये प्रकल्प किंमतीच्या ... जिल्ह्यातील विविध बँकेची ... झाली आहे तर यापैकी २ कोटी ... रुपयांच्या अनुदानाचे प्रत्यक्षात ...ले असल्याची माहिती रायगडचे ...कारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी ...

...ग व शहरी क्षेत्रातील गरजू ...जगार व सुशिक्षित बेरोजगारांना ...राची संधी उपलब्ध करुन ... राज्य शासनाने सुरु केलेल्या ... रोजगार निर्मिती कार्यक्रम ...रायगड जिल्ह्यातील तरुण नव ...कडून अत्यंत सकारात्म असा ...लाभला आहे. ...मंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमांतर्गत सद्य:स्थितीबाबत जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी नुकतीच आढावा बैठक घेतली.या कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात एकूण ४५६ प्रकरणांची जिल्हा कार्यबल समितीद्वारे बँकांकडे शिफारस करण्यात आली असून, एकूण ८१ प्रकरणात १ कोटी २३ लाख ०५ हजार प्रकल्प किंमतीच्या प्रकरणांना बँकांनी मंजूरी दिली आहे. त्यापैकी ४० प्रकरणांसाठी ६० लाख ९० हजार अनुदान दावे प्राप्त आहेत.

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात जिल्हा कार्यबल समितीद्वारे एकूण ८०८ कर्ज प्रकरणे बँकेकडे मंजूरीस्तव शिफारस करण्यात आली होती, यापैकी १३१ प्रकरणांमध्ये २ कोटी ३० लाख ४६ हजार प्रकल्प किंमतीच्या ... प्राप्त आहे आणि त्यापैकी २ कोटी १६ हजार रुपयांचे अनुदान प्रत्यक्षात वितरित करण्यात आले आहे, अशी माहिती जिल्हा कार्यबल समितीच्या बैठकीत जिल्हा उद्योग केंद्राचे महाव्यवस्थापकजी.एस.हरळ्या यांनी दिली.

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेंतर्गत राज्याच्या उद्योग विभागामार्फत राबविण्यात येणारी महत्वाकांक्षी योजना राज्यात रायगड जिल्हा उद्योग केंद्र व महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांच्यामार्फत राबविण्यात येत आहे. मुख्यमंत्री राजगार निर्मिती कार्यक्रम योजनेंतर्गत ग्रामीण व शहरी क्षेत्रातील गरजू लोकांना रोजगार व सुशिक्षित बेरोजगारांना स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देण्यासाठी राज्य शासनाने ही योजना ...

पुढारी

# तरुणाईचा 'कनेक्ट' वाढवण्यात जिल्हा प्रशासन यशस्वी

## सोशल मीडियाचा जिल्हाधिकाऱ्यांकडून कल्पकतेने वापर, दोनच दिवसांत उत्स्फूर्त प्रतिसाद

अलिबाग : पुढारी वृत्तसेवा

कोरोना निर्बंधामुळे तरुणाईसह जनसामान्य आणि जिल्हा प्रशासन यांच्या संपर्कात निर्माण झालेली नेमकी अडचण हेरुन रायगडचे जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी ही अडचण दूर करुन तरुणाईसह सर्वांचा जिल्हा प्रशासनाबरोबरचा 'कनेक्ट' वाढविण्याकरिता सोशल मीडियाचा वापर अत्यंत कल्पकतेने केला असून त्यास अवघ्या दोनच दिवसांत चांगले यश देखील लाभले आहे.

जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी लोकाभिमुख, गतिमान व पारदर्शक प्रशासन म्हणून केलेले कामकाज जनतेपर्यंत तत्काळ पोहोचविण्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालय सोशल मीडियाच्या माध्यमातून अपडेट ठेवण्यासाठी ही नवी संपर्क यंत्रणा, रायगड जिल्हाधिकारी कार्यालय ट्विटर हँडल @ CollectorRaigad, फेसबुक पेज @collector.raigad तर इन्स्टाग्राम अकाऊंट @collectorsraigad या सोशल मीडिया प्लॅटफॉर्म्सच्या माध्यमातून कार्यान्वित केली आहे. याला तरुणाईसह जनसामान्यांकडून उत्स्फूर्त आणि विक्रमी प्रतिसाद मिळत आहे.

रायगड जिल्हाधिकारी कार्यालयाच्या या सोशल मीडिया प्लॅटफॉर्म्सवरील जिल्हाधिकारी फेसबुक पेजला १५ हजार ७०७ फॉलोअर्ससह तर १२ हजार २२९ लाईक्स लाभल्या आहेत. जिल्हाधिकारी कार्यालय ट्वीटर पेजला ५ हजार ७७० फॉलोइर्स तर इन्स्टाग्राम पेजला ११८ फॉलोअर्स लाभले असून, त्यामध्ये दरदिवशी वाढ होत असल्याचे दिसून येत आहे.

### नागरिकदेखील सूचना करु लागले

जनतेपर्यंत तत्काळ पोहोचविण्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयाने सोशल मीडियाच्या माध्यमातून अपडेट ठेवण्यासाठी ही नवी संपर्क यंत्रणा कार्यान्वित केली आहे. त्याचा वापर करुन नागरिक आपल्या सूचना व काही समस्या देखील यावर मांडतात आणि त्या समस्यांचे निराकरण देखील शासनाच्या संबंधित यंत्रणांकडून होत असल्याचा अनूभव नागरिकांना येत असल्याने नागरिकांनी देखील समाधन व्यक्त केले .

जिल्हाधिकारी कार्यालयाप्रमाणेच रायगड जिल्हा माहिती अधिकारी मनोज सानप यांनी सुरु केलेल्या जिल्हा माहिती कार्यालयाच्या सोशल मीडिया प्लॅटफॉर्म्सवरील फेसबुक पेजला ५ हजार २८१ फॉलॉअर्ससह ४ हजार ५८१ लाईक्स लाभल्या आहेत.

कोरोना निर्बंधामुळे मुळातच संपर्कावर खुप मर्यादा आल्या. त्यातच शासकीय कार्यालयांत येण्याचे जनसामान्यांचे प्रमाण कमी झाले. परिणामी शासकीय कार्यालयांकडून अपेक्षीत माहिती मिळवणे आणि त्या अनूशंगाने आपली कामे करुन घेणे यामध्ये अनेक अडचणी येत होत्या. त्यातच सरकारी कार्यालयात विद्यार्थी आणि तरुणांशी निगडीत कामे देखील संपर्का अभावी होऊ शकत नव्हती. हीच संपर्कातील नेमकी अडचण हेरुन रायगडचे जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांनी ही अडचण दूर करुन तरुणाईसह सर्वांचा जिल्हा प्रशासनाबरोबरचा 'कनेक्ट' वाढविण्याकरिता सोशल मीडियाचा वापर कल्पकतेने केला असून त्यास अल्पावधित लाभलेल्या प्रतिसाद पहाता जनसामान्यांकडून या संकल्पनेचे स्वागतच केल्याचे दिसून येत आहे.

सध्याचा काळ सोशल मीडियाचा काळ म्हणून ओळखला जातो. शासकीय असो वा अशासकीय, कोणतीही व्यक्ती वा संस्था, प्रत्येकाला स्वत:च्या कामकाजाविषयीची माहिती जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी सोशल मीडियाच्या विविध प्लॅटफॉर्मवरुन प्रसारीत करणे, ही बाब अत्यावश्यक बनली आहे.जास्तीत जास्त युवकांनी, नागरिकांनी जिल्हाधिकारी कार्यालयाच्या सोशल मीडिया अकाऊंट्सना फॉलो करावे, असे आवाहन जिल्हा प्रशासनाकडून करण्यात आले आहे.



# निर्यातक्षम उद्योगवाढीसाठी पायाभूत सुविधा पुरविणार

## जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांचे प्रतिपादन

। अलिबाग । विशेष प्रतिनिधी ।

रायगड जिल्हा विविधतेने नटलेला जिल्हा आहे. येथील निर्यात व्यवसायास मोठा वाव आहे. त्यामुळे जिल्ह्यातील निर्यात व्यवसाय वृद्धिंगत होण्यासाठी पायाभूत सुविधा विकसित करण्यावर भर दिला जाईल, असे प्रतिपादन जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांनी केले.

जिल्हाधिकारी कार्यालयात दि.१४ जानेवारी रोजी निर्यात प्रचालन समितीची ऑनलाईन बैठक संपन्न झाली, त्यावेळी ते बोलत होते. यावेळी जिल्हा उद्योग केंद्राचे महाव्यवस्थापक जी.एस. हरळय्या, जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी उज्वला बाणखेले, जिल्हा अग्रणी बँकेचे व्यवस्थापक विजयकुमार कुलकर्णी, तळोजा मॅन्युफॅक्चरिंग असोसिएशनचे व महाड मॅन्युफॅक्चरिंग असोसिएशनचे प्रतिनिधी आदी उपस्थित होते.

जिल्हाधिकारी डॉ. कल्याणकर यांनी बैठकीच्या सुरुवातीला रायगड जिल्ह्यातील निर्यात प्रचालन क्षेत्रात वाव असलेल्या विविध उद्योगांची माहिती घेतली. यासंदर्भात त्यांनी जिल्ह्यातील उद्योजकांना आवाहन केले आहे की, त्यांनी निर्यात व्यवसायासाठी रायगड जिल्ह्यात कोणकोणत्या क्षेत्रात वाव आहे, निर्यात व्यवसाय वाढीस लागण्यासाठी कोणकोणते घटक व अन्य सोयी सुविधांची आवश्यकता आहे याबाबत जिल्हा प्रशासनास पुढे येऊन सांगावे.यावेळी जिल्हा उद्योग केंद्राचे महाव्यवस्थापक श्री. हरळय्या यांनी जिल्ह्यात प्रामुख्याने गणेशमूर्ती, मत्स्यव्यवसाय, लोखंड व स्टील, केमिकल, लॉजिस्टिक, पांढरा कांदा, अल्फान्सो आंबा, फार्मास्यूटिकल अशा विविध क्षेत्रात निर्यात व्यवसाय वाढीस लावण्यासाठी पूरक परिस्थिती असल्याचे सांगितले.

### पांढरा कांदा, आंब्याचे उत्पादन

जिल्ह्यात पांढरा कांद्याचे २५० हेक्टर उत्पादन क्षेत्र असून, जवळपास ४ हजार मेट्रिक टन इतके उत्पादन होत आहे. यात २०० ते २२५ शेतकरी सक्रिय आहेत. या पांढऱ्या कांद्याला नुकतेच दि.९ सप्टेंबर २०२१ रोजी अलिबाग तालुक्यासाठी भौगोलिक मानांकनास मान्यताही मिळाली आहे. त्याचप्रमाणे रायगडच्या अल्फान्सो मँगोची जिल्ह्यात जवळपास १४ हजार हेक्टर क्षेत्रावर लागवड होत असून, जवळपास ३० हजार मेट्रिक टन उत्पादन आहे. रायगड जिल्ह्यास १२२ किलोमीटर लांबीचा समुद्रकिनारा लाभला असून, येथे मत्स्योत्पादन व्यवसायात अंदाजे ४० हजार मेट्रिक टन उत्पादन घेतले जाते.



### निर्यात व्यवसायात रायगडचे योगदान महत्त्वपूर्ण

केंद्र सरकारच्या मिनिस्ट्री ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्रीज च्या अंतर्गत डायरेक्टर जनरल ऑफ कमर्शियल इंटेलिजन्स अँड स्टॅटिस्टिकस या विभागाच्या अधिकृत आकडेवारीनुसार, सध्या महाराष्ट्राचा निर्यात व्यवसाय रू.२.५ लाख कोटी इतका असून, रायगड जिल्ह्याचा ऑक्टोबर २०२१ पर्यंतचा निर्यात व्यवसाय जवळपास रु. २० हजार कोटी म्हणजेच महाराष्ट्राच्या एकूण निर्यात व्यवसायाच्या ७.५६ टक्के इतका आहे. तर, एकूण कोकण पट्ट्यातील निर्यात व्यवसायात रायगड जिल्ह्याचे योगदान ३४ टक्के आहे.

> रायगड जिल्ह्यातील जास्तीत जास्त उद्योजकांनी निर्यातक्षम उद्योगवाढीसाठी पुढे यावे, त्यांना जिल्हा प्रशासनाकडून सर्व प्रकारचे मार्गदर्शन व सहकार्य केले जाईल.
>
> – महेंद्र कल्याणकर, जिल्हाधिकारी

# अनधिकृत बांधकामावर जिल्हा प्रशासनाची कारवाई

▶वार्ताहर : अलिबाग

जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली उपविभागीय अधिकारी अलिबाग प्रशांत ढगे व त्यांच्या पथकाने देवेन जितेंद्र मेहता यांच्या अनधिकृत बंगल्याची वाडी व अनधिकृत बांधकाम नष्ट करण्याची कारवाई केली.

मौजे सतिर्जे, ता.अलिबाग येथील गट नंबर १३३/५ व १३३/७ या मिळकतीत टेकडी खोदून मोठ्या प्रमाणात अनधिकृत बांधकाम करण्यात आले असल्याची तक्रार जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्याकडे करण्यात आली होती.

या तक्रारीच्या अनुषंगाने मौजे सतिर्जे येथील १३३/५ व १३३/७ मधील बांधकामांची मोजमापे कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत घेण्यात आली. यावेळी बांधकाम परवानगीपेक्षा वाढीव अनधिकृत बांधकाम केल्याचे निदर्शनास आले. त्याचप्रमाणे बांधकाम परवानगी हॉर्टीकल्चर प्रोजेक्ट या वाणिज्य कारणासाठी असताना सद्य:स्थितीत याचा वापर प्रत्यक्षात मात्र रहिवासी कारणासाठी केला जात असल्याचे प्रशासनाच्या निदर्शनास आले.

वाढीव अनधिकृत बांधकाम व वापरात बदल केल्यामुळे बांधकामधारक देवेन जितेंद्र मेहता यांना जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्याकडील १ डिसेंबर २०२१ रोजीच्या आदेशान्वये वाढीव अनधिकृत बांधकाम ३० दिवसांच्या आत स्वतःहून काढून टाकण्याचे आदेश देण्यात आले होते.

देवेन मेहता यांनी दिलेल्या मुदतीत वाढीव बांधकाम स्वतःहून काढून न टाकल्याने महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम, १९६६ मधील तरतुदीनुसार दि.१० जानेवारी २०२२ रोजी जिल्हाधिकारी डॉ.महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली उपविभागीय अधिकारी अलिबाग प्रशांत ढगे व त्यांच्या पथकाने देवेन जितेंद्र मेहता यांच्या बंगल्याची वाडी व अनधिकृत बांधकाम नष्ट करण्याची कारवाई केली असल्याची माहिती जिल्हा प्रशासनाने दिली आहे.

# महसूलवसुलीत रायगडची बाजी

## तिजोरीत ११0 टक्के भरणा; गौणखनिज उत्खननातून १६0 कोटी

कुणाल लोंढे, पनवेल

राज्यात महसूलवसुलीत बाजी मारत रायगड जिल्हा महसूल विभागाने यशस्वी गुढी उभारली आहे. कोकण विभागातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग आदी जिल्ह्यांमध्ये रायगड जिल्ह्याने जमीन महसूल, करमणूक शुल्क आणि गौनखनिज उत्खननात ९१ टक्के वसुली करून पहिला क्रमांक पटकावला आहे.जिल्ह्यात ११० टक्के महसूलवसुली झाली असून,गौणखनिज ...ननातून जिल्ह्याने यावर्षी विक्रमी ...न्न मिळविले आहे. आजवरचा ...धिक १६० कोटींचा महसूल गोळा ...ा आहे.

...ाष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्रकल्प ... घातलेल्या रायगड जिल्ह्यातून ...ळणाऱ्या महसूल उत्पन्नाकडे

> महसूल विभागाने केलेली कामगिरी कौतुकास्पद आहे, अतिरिक्त जिल्हाधिकारी अमोल यादव, जिल्हाधिकारी महेंद्र कल्याणकर यांच्या मार्गदर्शनाखाली कर्मचारी अधिकाऱ्यांनी घेतलेल्या परिश्रमामुळे लक्ष्यपूर्ती झाली. पुढील वर्षी याहीपेक्षा अधिक उद्दिष्टपूर्तीचा प्रयत्न राहील.
>
> – राहुल मुंडके, प्रांतअधिकारी पनवेल

मटा

# रायगडाच्या रस्ते विकासाला गती

## दहा हजार कोटींची कामे प्रगतिपथावर; १३ प्रमुख रस्त्यांची कामे वर्षभरात



हर्षद कशाळकर, लोकसत्ता

**अलिबाग:** रायगड जिल्ह्यातील रस्ते विकासाला केंद्र आणि राज्य सरकारने गती दिली आहे. जिल्ह्यात दहा हजार कोटींच्या रस्त्यांची कामे सध्या प्रगतिपथावर आहे. याअंतर्गत १३ प्रमुख रस्त्यांचा विकास केला जातो आहे. आणखी १,७९२ कोटींची चार कामे प्रस्तावित करण्यात आली, त्यामुळे आगामी काळात दळणवळण सुसह्य आणि गतिमान होणार आहे.

रायगड जिल्ह्यात पुर्वी १५४ किलोमीटर लांबीचे राष्ट्रीय महामार्ग होते. यात ३४८ किलोमीटर लांबीच्या नवीन मार्गांचा समावेश करण्यात आला, त्यामुळे आता जिल्ह्यात ५०३ किलोमीटर लांबीचे राष्ट्रीय महामार्ग झाले आहेत. यात पेण ते खोपोली, महाड ते रायगड किल्ला, वडखळ ते अलिबाग, दिघी ते माणगाव, इंदापूर ते माणगाव, पाली खोपोली आणि पुणे ताम्हाणी घाटमार्गे माणगाव रस्त्याचा समावेश आहे. नवी मुंबई प्रस्तावित विमानतळाला जोडणाऱ्या प्रमुख रस्त्यांची कामेही जोमाने सुरू आहेत. जेएनपीटीला जोडणाऱ्या रस्त्यांचाही विस्तार करण्यात आला आहे. त्यामुळे जिल्ह्यातील रस्त्यांचे जाळे विस्तारत आहे.

राज्य सरकारच्या माध्यमातून साडेआठशे कोटींच्या रेवस करंजा पूलाची निविदा मागविण्यात आली आहे. त्याचबरोबर रेवस ते रेड्डी सागरी मार्गासाठी नऊ हजार कोटींची तरतूद करण्यात आली आहे. एमएसआरडीसीच्या माध्यमातून हा रस्ता केला जाणार असून रस्त्याच्या सुधारित आराखड्यालाही मंजुरी देण्यात आली आहे. याशिवाय द्रुतगती महामार्गांच्या धर्तीवर मुंबई ते गोवा ग्रिनफिल्ड एक्सप्रेस महामार्ग उभारण्याचे राज्य सरकारने निश्चित केले आहे. अलिबाग विरार मल्टिमॉडेल कॉरिडोरसाठी भूसंपादन प्रक्रिया सुरू करण्यात आली आहे. त्यामुळे हे कामही आगामी काळात मार्गी लागणार आहे.

मुंबई-गोवा महामार्गाचे पळस्पे ते इंदापूर आणि इंदापूर ते कशेडी महामार्गाचे चौपदरीकरण हाती घेण्यात आले आहे. यातील पळस्पे ते इंदापूर या रखडलेल्या कामाला गती देण्याचा प्रयत्न केला जात आहे. इंदापूर ते कशेडी मार्गातील वीर भोगाव आणि भोगाव ते खवटी मार्गातील कामे येत्या काही महिन्यांत पूर्ण होणे अपेक्षित आहे. इंदापूर ते वडपाले टप्प्यातील काम काही अडचणींमुळे रेंगाळले आहे.

राज्याचा औद्योगिक जिल्हा अशी रायगडची ओळख आहे. महाकाय औद्योगिक प्रकल्प जिल्ह्यात येऊ घातले आहेत. नवी मुंबईचे विमानतळही रायगड जिल्ह्यात विकसित होत आहे. पर्यटनाच्या कक्षाही रुंदावत आहेत. त्यामुळे सर्व रस्ते विकासाची ही सर्व कामे लवकर मार्गी लागली तर विकासाला चालना मिळणार आहे.

### मुंबई गोवा महामार्ग सद्य:स्थिती

| | | | |
|---|---|---|---|
| पनवेल इंदापूर | ८४ किमी | ९४२ कोटी | नवीन कंत्राटदार कार्यवाही सुरू |
| इंदापूर ते वडपाले | २६ किमी | १२०२ कोटी | ३५ टक्के पूर्ण |
| वीर ते भोगाव खुर्द | ३८.७८ किमी | १५९८ कोटी | ७९.९० टक्के पूर्ण |
| भोगाव ते खवटी | ८.९ किमी | ७४३ कोटी | ७६.९० टक्के पूर्ण |

| महामार्ग | किमत | कामाची सद्य:स्थिती |
|---|---|---|
| १ दिघी माणगाव | ४५७ कोटी | ९४.२८ टक्के पूर्ण |
| २ आगरदांडा इंदापूर | ३५५ कोटी | ९४. ६३ टक्के पूर्ण |
| ३ पुणे हद्द ते माणगाव | २२३ कोटी | ९८.०० टक्के पूर्ण |
| ४ वाकण पाली खोपोली | ३७६ कोटी | ८६.५३ टक्के पूर्ण |
| ५ पाटणाव खोपोली | ११९ कोटी | ९०.८८ टक्के पूर्ण |
| ६ पेण खोपोली | ३०१ कोटी | ६२.७६ टक्के पूर्ण |

# रायगडच्या वैद्यकीय महाविद्यालयाला निधी कमी पडू देणार नाही - उद्धव ठाकरे

## अलिबाग येथील वैद्यकीय महाविद्यालय आणि सर्वोपचार रुग्णालयाचे भूमिपूजन

लोकसत्ता, विशेष प्रतिनिधी



### कार्यक्रमाला शिवसेनेचे आमदार गैरहजर

अलिबाग येथील वैद्यकीय महाविद्यालयाच्या भूमिपूजन समारंभाला शिवसेनेचे जिल्ह्यातील तीनही आमदार गैरहजर राहिले. त्यामुळे जिल्ह्यात महाआघाडीतील विसंवाद आणि नाराजी पुन्हा एकदा समोर आली. पालकमंत्री अदिती तटकरे यांच्यावरील नाराजीमुळे शिवसेनेच्या तिन्ही आमदारांनी या कार्यक्रमावर बहिष्कार टाकला.

**अलिबाग :** उद्योग आणि विकासाच्या दिशेने वाटचाल करतांना लोकांच्या आरोग्याची काळजी घेणं गरजेचं आहे. यासाठी राज्य सरकारने गेल्या दोन वर्षांत आरोग्य यंत्रणा बळकटीकरणावर भर दिला आहे. रायगड जिल्ह्यात आज आधुनिक सोयीसुविधा वैद्यकीय महाविद्यालय आणि रुग्णालयाची उभारणी आपण करतो आहोत. या रुग्णालयासाठी तसेच वैद्यकीय महाविद्यालयासाठी जे सहकार्य लागेल ते राज्यसरकारकडून दिले जाईल. त्याचबरोबर निधी कमी पडू दिला जाणार नाही अशी ग्वाही मुख्यमंत्री उद्धव ठाकरे यांनी दिली. ते अलिबाग येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय आणि सर्वोपचार रुग्णालयाच्या भूमिपूजन समारंभात बोलत होते.

मुख्यमंत्री उद्धव ठाकरे आणि उपमुख्यमंत्री अजित पवार हे दुरदृश्य प्रणालीच्या माध्यमातून या कार्यक्रमात सहभागी झाले. लोकांच्या आरोग्याची काळजी घेणे हे राज्य सरकारचे कर्तव्य आहे. त्यामुळे आरोग्य सुविधांच्या बळकटीकरणावर राज्य सरकारने भर दिला आहे. या काळात लसीकरणावर भर द्यायला हवा. लसीकरणानंतरही करोनाची लागण होत असली तरी त्याची घातकता कमी होते. जीव वाचविण्याचे सुरक्षा कवच म्हणून लसीकरण महत्त्वाचे असल्याचे मुख्यमंत्री म्हणाले. वडखळ येथे ट्रॉमा केअर रुग्णालय उभारण्याची घोषणा त्यांनी या वेळी केली.

रुग्णांची सेवा हीच खरी ईश्वर सेवा असते असे म्हणतात, या वैद्यकीय महाविद्यालय आणि रुग्णालयाच्या माध्यमातून रुग्णसेवेचे काम होईल, असा विश्वास यावेळी राष्ट्रवादीचे अध्यक्ष शरद पवार यांनी या वेळी व्यक्त केला.

अलिबाग येथील उसर येथे ५२ एकर परिसरात या महाविद्यालयाची उभारणी केली जाणार आहे. यासाठी राज्य सरकारच्या माध्यमातून साडेचारशे कोटी रुपयांचा निधी उपलब्ध करून दिला जाणार आहे.

# इतर महत्वाचे




❋ रायगड जिल्ह्याच्या वार्षिक योजनेसाठी उपमुख्यमंत्र्यांनी मंजूर केला २२५.४४ कोटीचा निधी
❋ रायगड जिल्हा माहिती भवन उभारण्यासाठी राज्य मंत्रिमंडळाची मंजूरी
❋ पेण तालुक्यातील गागोदे येथे साकारणार आचार्य विनोबा भावे यांचे शिल्प
❋ आरोग्यदायी रायगड जिल्हा होण्याच्या दिशेने माणगाव येथे ट्रामा केअर युनिट उभारण्यास शासनाची मान्यता
❋ प्रादेशिक पर्यटन विकास योजनेंतर्गत होणार जिल्ह्यातील विविध लोकप्रिय स्थळांचा कायापालट
❋ रायगड जिल्ह्यातील न्यायालयीन यंत्रणेचे भौतिक सक्षमीकरण करण्याचा यशस्वी प्रयत्न
❋ महाड दिवाणी न्यायालयासाठी शासकीय जागा प्रदान
❋ रोहा तालुक्यातील भुवनेश्वर येथे १०० खाटांचे स्त्री रुग्णालय उभारण्यासाठी शासकीय जमीन हस्तांतरीत करण्याचे आदेश पारित
❋ सुधागड (पाली) येथील आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह इमारत बांधकामासाठी १२ कोटी ५० लक्ष रकमेस शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान.
❋ पर्यटन स्थलांच्या विकास कामांसाठी प्रशासकीय मंजुरी प्राप्त ४५ कोटी रुपयांपैकी
❋ पहिल्या टप्प्यात रु. २० कोटी निधी वितरणास शासनाची मान्यता.
❋ जिल्हा वार्षिक नियोजनाचा निधी मार्च २०२२ अखेर १००% खर्च करण्यात रायगड जिल्हा राज्यात अव्वल स्थानी.
❋ जिल्ह्यात मतदारयादी विशेष संक्षिप्त पुनर्रिक्षण कार्यक्रम यशस्वी.
❋ जिल्ह्यातील निर्यात व्यवसाय वृद्धिंगत होण्यासाठी पायाभूत सुविधा विकासावर भर.
❋ रायगड जिल्हाधिकारी कार्यालय सोशल मीडियाच्या माध्यमातूनही राहतेय अपडेट...

❋ महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश, २०१५ च्या कलम ३ (१) अन्वये प्राप्त अधिकारानुसार जिल्हाधिकारी डॉ. महेंद्र कल्याणकर यांनी जिल्हाधिकारी कार्यालयाच्या अधिनस्त महसूल कार्यालयामार्फत अभिलेख नक्कल देणे (तलाठी कार्यालय), अभिलेख नक्कल देणे (मंडळ अधिकारी), कार्यालय अभिलेख कक्षातून नक्कल देणे (तहसील कार्यालय), अभिलेख पक्षातून नक्कल देणे (उपविभागीय अधिकारी कार्यालय), ७/१२, ८ अ आणि फेरफार ची ऑनलाईन प्रत पुरविणे, ३० टक्के महिला आरक्षण दाखला, मराठा समाजाच्या मुलांकरिता सैन्य भरतीसाठी छाती /उंची या सवलतीसाठी देय असलेले प्रमाणपत्र जनगणनेच्या आधारे अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती लोकसंख्या/ गावाची लोकसंख्या प्रमाणपत्र, भूसंपादन दाखला, मतदार यादीत नाव समाविष्ट करणे, मतदार यादीतील नावातील तपशील दुरुस्ती करणे, मतदार यादीतील नाव एका भागातून त्याच मतदारसंघातील दुसऱ्या भागात स्थलांतरीत करणे, मतदार यादीमधील नाव कमी करणे, काम मागणी, भूसंपादन दाखला, भूसंपादन ना-हरकत दाखला, भविष्य निर्वाह निधी मधून रक्कम मिळण्यास आदेश निर्गमित करणे, अधिकारी-कर्मचाऱ्यांची वैद्यकीय देयके या १८ प्रकारच्या लोकसेवा नागरिकांना पुरविण्यात येतात.

75 आज़ादी का अमृत महोत्सव

ओएनजीसी
ONGC



# The Planet

## पर्यावरण के प्रति प्रतिबद्ध ओएनजीसी

We have been consciously working on a plan to save the only known home to life- Planet Earth. That is the reason you will find multiple initiatives by ONGC for a sustainable future.





**ONGOING PROGRAMS**

Clean Development Mechanism Projects • Global Methane Initiative • Reduction in Gas Flaring • Renewable Energy • LED Program • Rain Water Harvesting • Green Buildings • Paperless Offices

स्वच्छ विकास तंत्र परियोजना • वैश्विक मीथेन पहल • गैस फ्लेयरिंग में कमी • नवीकरणीय ऊर्जा • एलईडी कार्यक्रम • बारिश के पानी का संग्रहण • ग्रीन बिल्डिंग • कागज रहित कार्यालय

**UPCOMING PROGRAMS**

Carbon Neutrality • Water Neutrality • Carbon Capture, Utilization and Storage

कार्बन तटस्थता • जल तटस्थता • कार्बन कैप्चर, उपयोग और भंडारण

**Oil and Natural Gas Corporation Limited**

To know more about how we are leaving a greener footprint behind, please visit ongcindia.com

